


नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**



महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत
प्राज्ञपाठशाला मंडळ वाई, संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ३२ । अंक ११ । ऑगस्ट १९७९
किंमत २ रुपये । वार्षिक वर्गणी १८ रुपये

---



---

**पत्रव्यवहार :**

**संपादकीय :** भा. ग. सुर्वे
प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई–४१२८०३

**व्यवस्थापकीय :** पां. गो. आपटे,
व्यवस्थापक 'नवभारत' मासिक
द्वारा : प्राज्ञ प्रेस, वाई (जि. सातारा)

अनुक्रमणिका








# नवभारत

ऑगस्ट १९७९

अ नु क्र म



## लेखक-परिचय

☐ **सौ. कमलाबाई टिळक** : इंग्रजीच्या सेवानिवृत्त प्राध्यापिका (बनारस व बडोदा विद्यापीठ) व 'स्त्रीजीवनविषयक काही प्रश्न', 'आकाशगंगा' (कथा) इ. ग्रंथांच्या लेखिका, मुंबई. ☐ **अनिरुद्ध कुलकर्णी** : कवी, लेखक व संपादक 'आनंदवन' नियतकालिक, पुणे. ☐ **प्रभाकर पाध्ये** : मराठी साहित्यिक, सौंदर्यमीमांसक, पत्रकार व विचारवंत, पुणे. ☐ **वा. वि. मिराशी** : संस्कृतचे सेवानिवृत्त प्राध्यापक, संस्कृत, प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृतीचे गाढे अभ्यासक व संशोधक, नागपूर. ☐ **म. द. हातकणंगलेकर** : साक्षेपी समीक्षक, इंग्रजीचे प्राध्यापक व विभाग प्रमुख, विलिंग्डन महाविद्यालय, सांगली. ☐ **एस. डी. इनामदार** : मराठी कथालेखक व विश्वकोशातील ललित कला, भाषाशास्त्र इ. विषयांचे संपादक, वाई. ☐ **व. ग. भदे** : मराठी विश्वकोशाच्या विज्ञान व तंत्रविद्या कक्षेचे प्रभारी विभाग संपादक, वाई.

## संपादकीय—

### डुकर, वराह आणि डिग्री

डुकराला 'डुकर' म्हणावे, 'वराह' म्हणू नये अशी गळ, श्री. पु. ल. देशपांडे ह्यांनी काही काळापूर्वी सर्व मराठी माणसांना घातली होती. हा अतिशय योग्य असा सल्ला आहे. कोणताही संस्कृत शब्द, त्याच अर्थाचा निर्देश करणाऱ्या मराठी शब्दाहून अधिक प्रतिष्ठित असतो ही खोटी समजूत. डुकराला 'वराह' म्हणण्याचा मोह मराठी माणसाला होण्याचे हे एक कारण असावे. पण हे एकमेव कारण नव्हे. येथे जो प्रतिष्ठेचा विचार असेल त्याचा संबंध शब्दाच्या किंवा शब्दाने निर्दिष्ट होणाऱ्या वस्तूच्या प्रतिष्ठेशी तितकासा नसतो; त्या वस्तूशी संबंधित असणाऱ्या माणसांच्या प्रतिष्ठेविषयींचा तो विचार असतो. उदा. डुकरांची पैदास वाढविणे आणि सुधारणे हे कल्याणकारी राज्याचे एक महत्त्वाचे काम आहे. ह्या कामाची जबाबदारी ज्याच्यावर असते त्या अधिकाऱ्यासाठी 'प्रभारी, डुकरवाडा' हे पदनाम मुक्रर केले तर सामान्यपणे ते त्याला खटकेल. 'पिगरी' हा इंग्रजी शब्द केवळ वस्तुवाचक, प्रतिष्ठेच्या दृष्टीने अपक्ष आहे. 'डुकरवाडा' ह्या शब्दाच्या वाच्यार्थापेक्षा त्याचा लाक्षणिक अर्थ अधिक प्रबळ असतो अशी साधार भीती प्रभारी, डुकरवाडा ह्यांना वाटणे शक्य आहे. 'प्रभारी, वराहालय' किंवा 'प्रभारी, वराहमंदिर' हे पदनाम, उलट, एखाद्या किताबासारखे गौरवकारी भासेल. डुकर हा प्राणिजातीतील इतरांसारखाच एक विशिष्ट प्राणी आहे आणि मांस, चरबी ह्यांच्यासाठी उपयुक्त आहे ह्या 'वैज्ञानिक' दृष्टीने डुकरांकडे आपण पाहू लागल्याशिवाय 'डुकरवाडा' हा शब्द प्रभारी मंडळींना मान्य होणार नाही.

वास्तविक हिंदू धर्माभिमानी जर जागरूक असते तर डुकराला 'वराह' म्हणण्याला त्यांनी आक्षेप घेतला असता. कारण वराह हा ईश्वराचा अवतार आहे. (तसेच, कूर्म हा अवतार आहे; हा मान कासवाला नाही.) तेव्हा वराहांचा वावर पौराणिक कालापर्यंत, फारतर धूसर इतिहासकालापर्यंत असू शकतो. व्यावहारिक जगात डुकरे वावरतात. 'जयकेतूने आपले खड्ग त्या भयंकर वराहाच्या उदरात खुपसले' हे वाक्य शोभून दिसते. त्याच्यात 'खुपसले' एवढाच शब्द खटकू शकेल. पण 'आमच्या लहानपणी पाल्यांत खूप वराह इतस्ततः हिंडत' हे वाक्य दिशाभूल करणारे ठरेल. खोलीत साचलेल्या कचऱ्यावर गालिचा पसरून तो दडवावा तसा हा प्रकार होईल.

पण श्री. देशपांडे पुढे जाऊन जेव्हा अशी तक्रार करतात, की 'आमची मराठीच आमच्या मराठीपासून दूर चालली आहे... पुस्तकातून लोकांच्या कानावर न पडलेले निम्म्याहून अधिक शब्द जर जाणार असतील तर होणार काय मला सांगा आपण ?' तेव्हा थोडा विचार करावा लागेल. कोंबड्याला 'कोंबडा' म्हणावे, कानावरून न जाणारा 'कुक्कुट' हा शब्द त्यासाठी वापरू नये हे अगदी योग्य. पण पुढील संभाषण घ्या. 'ताप किती आहे?' 'शंभर डिग्री'. 'डिग्री' हा इंग्रजी शब्द ह्या संदर्भात मराठी कानांवरून जाणारा आहे. तेव्हा तोही मराठीत दाखल करून घेऊ. भाषाशुद्धिवाद्याला तो वापरायचा नसेल तर एक पळवाट उपलब्ध आहे. ताप किती आहे ? ह्याचे उत्तर तो 'शंभर' एवढेच देईल. पण ही पळवाट आहे कारण 'शंभर काय ?' हा प्रश्न उरतोच आणि त्याचे उत्तर 'शंभर डिग्री— उदा. शंभर इंच नव्हे' असेच द्यावे लागेल.

आता समजा एखाद्याने विचारले, की " 'डिग्री' म्हणजे काय ?" ह्या प्रश्नाचे एका प्रकारचे उत्तर देता येईल. " हे बघ ! ताप आपण डिग्रीमध्ये मापतो. जशी लांबी मिटरमध्ये मापतो तसा ताप डिग्रीमध्ये मापतो. ताप मापायचे साधन म्हणजे हे थर्मामिटर. ह्या रेषेपर्यंत पारा असला तर ९६ डिग्री, पुढच्या रेषेपर्यंत असेल तर ९७ डिग्री, अशी डिग्री मापतात." हे उत्तर व्यवहारात पुरेसे आणि उपयुक्त आहे. पण समजा एखाद्या चौकस, अशिक्षित मराठी माणसाने यावर असे म्हटले, की " हे मला समजले पण " 'डिग्री' म्हणजे काय ?" हा माझा प्रश्न उरतोच. 'डिग्री' म्हणजे काय हे मला सांगा " ह्याला काय उत्तर देता येईल ?

समजा एखाद्या सुशिक्षित, म्हणजे साधारणपणे इंग्रजी जाणणाऱ्या मराठी माणसाने हा प्रश्न विचारला आणि सुशिक्षित मराठी माणसाने, निवळ मराठी न बोलता त्याला उत्तर द्यायचे ठरविले तर हे उत्तर असे राहील : " आपण जी मापतो ती क्वाँटिटी. क्वाँटिटी दोन प्रकारची असते. एक प्रकार म्हणजे एक्स्टेन्सिव्ह क्वाँटिटी; उदा. लांबी. एक्स्टेन्सिव्ह क्वाँटिटी मापण्यासाठी आपण मापनाचे एक युनिट मुक्रर करतो, उदा. मिटर. अशा युनिटच्या साहाय्याने आपण लांबी कशी मापतो हे आपल्या परिचयाचे आहे. क्वाँटिटीचा दुसरा प्रकार म्हणजे इन्टेन्सिव्ह क्वाँटिटी. उदा. उष्णतामान. विस्तवावर तवा ठेवला तर त्याचे उष्णतामान वाढत जाते. सुरवातीला तव्याला बोट लावले तर त्याचा स्पर्श काहीसा गरम असतो; काही वेळाने चटका बसतो, नंतर अधिक तीव्र चटका बसतो. म्हणजे त्याचे उष्णतामान अधिकाधिक तीव्र बनत जाते. जी क्वाँटिटी अशी कमी–अधिक तीव्र असते, ( कमी–अधिक विस्तारलेली नव्हे ), तिला इन्टेन्सिव्ह क्वाँटिटी म्हणतात. आता इन्टेन्सिव्ह क्वाँटिटी मापायचे युनिट म्हणजे डिग्री. लांबी कमी आहे म्हणजे ती कमी मिटर भरते; उष्णतामान कमी आहे म्हणजे त्याची तीव्रता कमी आहे, म्हणजे डिग्री कमी आहे. आता डिग्री कशी मापतात ? आपल्याला हे माहीत आहे, की तापत ठेवलेल्या तव्याला थर्मामिटर चिकटवले तर जसजसा तवा अधिक तापत जातो– म्हणजे त्याच्यापासून अधिकाधिक तीव्र चटका मिळू लागतो, म्हणजे उष्णतामानाची तीव्रता; म्हणजे डिग्री वाढत जाते–तसतशी थर्मामिटरमधल्या पाऱ्याची लांबी वाढत जाते. ह्या अनुभवावरून उष्णतामानाची तीव्रता-डिग्री–आणि नळीतल्या पाऱ्याची लांबी ह्यांच्यात आपण कोरिलेशन एस्टॅब्लिश करतो आणि पाऱ्याच्या लांबीच्या टर्म्समध्ये उष्णतामानाची डिग्री मेझर करतो."

निवळ इंग्रजी बोलणे जेव्हा आवश्यक असते असे प्रसंग सोडले तर आजची सुशिक्षित मराठी माणसे सामान्यपणे ह्या प्रकारच्या भाषेत एकमेकांशी बोलतात ह्यात शंका नाही. सुशिक्षित मराठी कान आणि तोंडे ह्या भाषेला सरावलेली आहेत.

हे स्पष्टीकरण, उदाहरणे वगळून निवळ मराठीतून असे देता येईल : " जे मापता येते ते परिमाण अशी परिमाणाची व्याख्या करू. परिमाणे दोन प्रकारची असतात. विस्तारित परिमाणे आणि तीव्रतारूपी परिमाणे. विस्तारित परिमाण हे मापनाचा एक एकक मुक्रर करून मापण्यात येते आणि हा एकक स्वतःच विस्तारित परिमाण असतो. तीव्रतारूपी परिमाण मापण्याचा एकक म्हणजे इयत्ता. विशिष्ट तीव्रतारूपी परिमाणाच्या ( उदा. उष्णतामान ) इयत्तांचा विशिष्ट विस्तारित परिमाणाच्या ( उदा. पाऱ्याची लांबी ) विस्ताराशी सहसंबंध प्रस्थापित करून ह्या इयत्ता मापण्यात येतात."

हे अपरिचित मराठी आहे. ते सुशिक्षित मराठी कानावरून गेलेले नाही. ते अशिक्षित मराठी कानांवरून गेलेले नाही. ते बहुधा विनोदी असेल. श्री. देशपांडे ह्यांचे भाषण ऐकायला जमलेल्या मंडळींपुढे त्यांनी ते आपल्या खास शैलीत वाचून दाखविले तर हास्याचे कल्लोळ फुटतील. ते मराठीपासून दूर गेलेले मराठी आहे. तेव्हा ते रद्दबातल करू.

पण शहरी आणि ग्रामीण, सुशिक्षित आणि अशिक्षित अशा सर्व प्रकारच्या मराठी कानांवरून गेलेल्याच केवळ मराठी शब्दांचा वापर करून 'डिग्री' म्हणजे काय ह्याचे स्पष्टीकरण श्री. देशपांडे

ह्यांच्यासारखा भाषाप्रभूही करू शकणार नाही हे उघड आहे. 'क्वाँटिटी' हा एक सर्वसामान्य इंग्रजी शब्द आहे. सक्तीने शिकविल्या गेलेल्या आजच्या इंग्लंडमध्ये एखादी स्वैपाकीणसुद्धा 'He ate enormous quantities of food' असे म्हणेल. मराठी स्वैपाकी 'त्याने अन्नाचे ढीग फस्त केले' असे काहीसे म्हणेल. ढीग लहानमोठे असतात आणि म्हणून त्या 'क्वाँटिटीज' असतात ह्या अमूर्त संकल्पने-पर्यंत मराठी पोचलेली नाही. सतराव्या शतकापासून इंग्रजी ही विज्ञानाची, तत्त्वज्ञानाची, कायद्याची, राज्यव्यवहाराची, व्यापारी व्यवस्थापनाची, लष्करी कारवाईची भाषा म्हणून वावरत आहे. हा प्रगल्भ, पल्लेदार, गुंतागुंतीचा व्यवहार ज्या वेगवेगळ्या प्रकारच्या अमूर्त संकल्पनांवर आधारलेला असतो त्या व्यक्त करण्यासाठी आवश्यक असलेले शब्द इंग्रजांनी लॅटिन आणि ग्रीक ह्या स्वतःच्या अभिजात भाषा आणि स्वतःची अस्सल बोलीभाषा याच्यापासून गरज पडेल तसे बनविले. व्यवहार विकसित होताना जेव्हा एखादी नवीन संकल्पना उदयाला येते तेव्हा ती शब्दरूप घेऊनच प्रकट होते. त्या व्यवहारात मग्न असलेल्या माणसांना तो शब्द सुचलेला असतो आणि म्हणून त्यांच्या बहुविध भाषिक वारशात उपलब्ध असलेल्या सामग्रीतून तो घडलेला असतो, पण तो नवीन शब्द असतो. कारण तो नवीन संकल्पना व्यक्त करीत असतो, त्याची भाषिक वारशात आता भर पडलेली असते. मराठी ही प्रामुख्याने गावाच्या पेठेची आणि पेढीची, जातीच्या पंचायतीपुढे चाललेल्या प्रकरणांची आणि प्राथमिक हुन्नराची भाषा राहिली. शिवाय अर्थात ती (आर्त) हृदयाचीही भाषा होती. ह्या मराठीत, जनाबाईच्या आणि बहिणाबाईच्या हृदयाला जाऊन भिडणाऱ्या आणि मराठी कानांना मोहरून टाकणाऱ्या मराठीत, फार काय, देशपांडे ह्यांनी मोठ्या गौरवाने ज्यांचा उल्लेख केला आहे त्या लोकहितवादी, तर्खडकर यांच्या सरळ, सोप्या, रुळलेल्या भाषेला जवळ असलेल्या मराठीत प्रगल्भ व्यवहार करता येणार नाहीत.

विज्ञानावर, सामाजिक तत्त्वज्ञानावर, विज्ञानाधिष्ठित तंत्रज्ञानावर, कायद्याच्या विकसित संकल्पनेवर आधारलेले प्रगल्भ व्यवहार इंग्रजांनी भारतात आणले. हे व्यवहार आपापली इंग्रजी परि-भाषा घेऊन आले. जे भारतीय ह्या वेगवेगळ्या व्यवहारांत सामील झाले त्यांनी ही इंग्रजी परिभाषा आत्मसात केली. यंत्राचे नाव इंग्रजी असते, त्याच्या भागांची नावे इंग्रजी असतात, त्यांच्याकडून होणाऱ्या प्रक्रियांची नावे इंग्रजी असतात. कारखान्यात काम करणारे मजूर हे शब्द वापरीत आपली कामे पार पाडतात. मराठी वकील कायद्याच्या क्षेत्रातील व्यवहाराविषयी जेव्हा एकमेकांशी मराठीतून बोलतात तेव्हा प्रत्यय आणि क्रियापदे सोडून जवळजवळ इतर सर्व शब्द पारिभाषिक इंग्रजी शब्द असतात. मराठी समाजाच्या वेगवेगळ्या विभागांच्या कानावर सतत पडणारे, त्यांना सवयीचे झालेले हे सर्व इंग्रजी शब्द सरळ मराठी मानावे असे अनेकांचे म्हणणे आहे. बोल्टला 'बोल्ट' म्हणावे, इंजिनियरला 'इंजिनियर' म्हणावे, ऑफिसर इन्-चार्जला 'ऑफिसर इन् चार्ज' म्हणावे, जस्टिसा-एबलला 'जस्टिसाएबल' म्हणावे, अॅब्स्ट्रॅक्टला 'अॅब्स्ट्रॅक्ट' म्हणावे, इ. हे सर्व मराठी शब्द आहेत. ठीक. आता इंग्रजी आणि मराठी ह्या दोन भिन्न भाषा आहेत अशी वस्तुस्थिती असल्यासारखी दिसते. कारण ज्यांना इंग्रजी येते पण मराठी येत नाही किंवा ज्यांना मराठी येते पण इंग्रजी येत नाही असे अनेक लोक आहेत. हे सर्व इंग्रजी शब्द सामावून घेतलेली मराठी भाषा ही इंग्रजीहून भिन्न असलेली जी मराठी भाषा आहे तिच्याहून भिन्न आहे. इंग्रजी बऱ्याच चांगल्या प्रकारे येणाऱ्या मराठी माणसांनाच ती समजेल आणि वापरता येईल. एखादा मराठी वायरमन आपल्या कामासाठी जी भाषा वापरतो तिच्यात काही थोडी इंग्रजी नामे, विशेषणे, क्रियाविशेषणे शिरलेली असतात. पण विजे-विषयीच्या ज्या ज्ञानावर वायरमनचे काम आधारलेले असते ते कमावण्यासाठी ज्या मराठीचा उपयोग करावा लागेल ती ज्याला इंग्रजी चांगल्या प्रकारे अवगत आहे त्यालाच समजू शकेल आणि वापरता येईल.

ह्या स्वरूपाचे मराठी अर्थात श्री. देशपांडे ह्यांना अमान्य आहे. ते म्हणतात, "एखाद्या पंडि-ताचे जर पुस्तक उघडले आणि वाचले तर (वाचकाला) काही लक्षात न आल्यामुळे एकच मात्र संदेश

अनुक्रमणिका

मिळेल की, बाबारे, ज्ञान मिळविणे हे तुझे काम नाही...आधी संस्कृत शिक, मग मराठी शिक, तरच आमचं मराठी कळेल असं आहे." तेव्हा इंग्रजी शिकल्यावरच जे मराठी कळते त्याला श्री. देशपांडे ह्यांचा आक्षेप आहे. " रयतेला कळेल अशा भाषेत बोलणे, रयतेला कळेल अशा भाषेत सांगणे हे कर्तव्यच आहे" अशी त्यांची ठाम भूमिका आहे. रयत इंग्रजी शिकत नाही. रयत संस्कृतही शिकत नाही. 'डिग्री', 'क्वाँटिटी', 'एक्स्टेन्सिव्ह', 'इंटेन्सिव्ह', 'कोरिलेशन', 'युनिट' ह्या शब्दांसाठी रयतेच्या तोंडात रूळलेले, कानांना सराव झालेले मराठी शब्द नाहीत.

ह्या शब्दांसाठी म्हणून, मराठी लोकांच्या जिभेवर असलेल्या असंख्य संस्कृत शब्दांशी नातेगोते असलेले संस्कृत शब्द वापरले तर श्री. देशपांडे ह्यांना ते नको आहेत; कारण भाषा रयतेपासून दूर जाते. इंग्रजी शब्द त्यांना नको आहेत कारण इंग्रजी शब्द म्हणजे मराठी शब्द नव्हेत हे त्यांना माहीत आहे. तेव्हा देशपांडे ह्यांच्या भूमिकेचा परिणाम एवढाच होईल, की आजची बहुसंख्य अशिक्षित अडाणी माणसे ही ज्ञानापासून दूर ठेवली जातील. वॉर्डबॉयला उष्णतामान किती डिग्री आहे हे सांगता येईल पण डिग्रीचा अर्थ समजून घेता येणार नाही. बहुजनसमाजातील एखादा माणूस असे म्हणू शकेल, की "हा ब्राह्मणी कावा आहे. आजची आमची मराठी हीच खरी मराठी आहे असे तुम्ही म्हणता, ती बदलायला विरोध करता तेव्हा वॉर्डबॉय सदैव वॉर्डबॉय रहावा, त्याला अधिक काही कळू नये आणि त्याने तुमच्याशी स्पर्धा करू नये ही तुमची इच्छा असते. तुम्ही इंग्रजी शिकता, तुम्ही संस्कृत शिकता, इंग्रजीमिश्रित मराठीत तुम्ही सर्व व्यवहार करता, त्या भाषेची सभेत टिंगल करता, खदखदून हसता पण त्याच भाषेतून व्यवहार पार पाडीत राहाता. महाराष्ट्रातल्या बहुसंख्य अशिक्षित, निरक्षर लोकांना ही भाषा समजण्याइतके इंग्रजी शिकवता येणार नाही हे तुम्हाला माहित आहे. मराठीतून हे ज्ञान आम्हाला देण्याचा कुणी प्रयत्न केला, की आम्ही आज बोलतो ती ही मराठी नव्हे म्हणून त्या मराठीचीही तुम्ही सुरेख टिंगल करता. ज्या कल्पना आम्हाला कधी शिवल्या नाहीत, ज्यांचा विचार आम्ही कधी केला नाही त्या आज आम्ही बोलत असलेल्या भाषेतूनच आम्हाला समजावून सांगितल्या पाहिजेत असा आग्रह तुम्ही धरता हा मोठा विनोद आहे. आणि तुम्ही आमच्या वतीने हा आग्रह धरता हा अधिक मोठा विनोद आहे. हा अभिजात विनोद आहे. कारण अभिजात विनोदाच्या कडा कारुण्यात भिजलेल्या असतात असे आम्ही ऐकले आहे. ज्ञान आमच्या नजिक असून, ते आम्हाला मिळवता येणे शक्य असून, भाषाशुद्धीला विरोध करीत असताना, आमच्या आजच्या बोलीभाषेच्या शुद्धतेचा आग्रह धरून, तुम्ही आमचे मित्र, आम्हाला अज्ञानातून बाहेर पडू देत नाही ह्याच्यात मोठे कारुण्य आहे. त्याच्यात तुमचा हा विनोद भिजलेला आहे."

---

सौ. कमलाबाई टिळक

# इस्किलसची सहा शोकनाट्ये : प्रस्तावना (उत्तरार्ध)

[ग्रीक नाटककार इस्किलसलिखित 'प्रॉमिथिअस बाउंड', 'द सप्लायंट्स', 'सेव्हन अगेन्स्ट थीव्ज' आणि 'द ओरेक्टिअन ट्रिलॉजी' अशा सहा शोकनाटयांचा मराठी अनुवाद महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळातर्फे प्रसिद्ध होत आहे. त्याला सौ. कमलाबाई टिळकांनी लिहिलेल्या प्रस्तावनेचा काही भाग (ग्रीक नाटयाच्या उगमासंबंधीचे विवेचन असलेला भाग 'नवभारत'च्या मार्च १९७८ अंकात यापूर्वीच प्रसिद्ध झालेला असल्याने तो वगळून) येथे मंडळाच्या अनुमतीने दोन लेखांकात प्रसिद्ध करीत आहोत. पहिला लेखांक– पूर्वार्ध– 'नवभारत'च्या जुलै, १९७९ अंकात प्रसिद्ध झाला. हा उत्तरार्ध– का. सं.]

---

'बद्ध प्रॉमिथिअस' हे इस्किलसचे सर्वांत प्रातिनिधिक नाटक आहे. हे नाटक त्याने लिहिले, तेव्हा त्याची प्रतिभा व कला यांनी परिपक्वतेचा उच्चांक गाठला होता असे रसिक समीक्षकांचे मत आहे. त्याच्या प्रतिभेच्या विराट, भव्य, दिव्य स्वरूपाचे या नाटकात दर्शन होते व त्याच्या साऱ्या कलागुणांचे पूर्णतया प्रकटीकरण या नाटकात झालेले दिसते.

या नाटकाचे कथानक इस्किलसने-एका प्रसिद्ध जुन्या लोककथेतून घेतले. इस्किलस आपली कथानके पुष्कळ वेळा अशीच लोककथेतून घेई. पण मग आपल्याला हवा तसा आशय त्यातून व्यक्त करण्यासाठी तो त्या लोककथेत पुष्कळ बदल करी.

आपल्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे या लोककथेवरही त्याने नाटयत्रिपुटी लिहिली असावी. पण त्यांपैकी 'बद्ध प्रॉमिथिअस' हे एकच, मधले नाटक, उपलब्ध आहे. बाकीची नष्ट झाली.

अथेन्समध्ये हेफिस्टसच्या (देवांचा लोहार, व्हल्कन) वेदीच्या अर्ध्या भागावर एका छोटया अग्निदेवाचे स्थान असे. तो अग्निदेवच प्रॉमिथिअस या नावाने ओळखला जाई. त्याच्या उत्सवाप्रीत्यर्थ दरवर्षी अथेन्समध्ये मशालीच्या शर्यती होत. प्रॉमिथिअस हा पृथ्वीचा पुत्र, त्याने झ्यूस या क्रॉनॉसपुत्राला, आपल्या पित्याला स्वर्गाच्या आधिपत्यापासून पदच्युत करून स्वतः सत्ताधीश होण्यास मदत केली. पण नंतर त्याने झ्यूसला फसवून अग्नी चोरला व तो भूलोकावर मानवाला दिला. त्याने मानवाला निरनिराळया कला व हस्तव्यवसायही शिकविले. त्यामुळे झ्यूस संतापला व त्याने प्रॉमिथिअसला कॉकेशस पर्वतावर लोखंडी बेडयांनी खिळवून ठेवले. झ्यूस त्याला एकाच अटीवर सोडायला तयार होता. ती अट म्हणजे त्याची सत्ता अनंत काळ कशी टिकवावी याचा उपाय प्रॉमिथिअसने सांगावा. प्रॉमिथिअस हा पृथ्वीपुत्र होता व त्याला भविष्यज्ञान होते. स्वर्गाची सत्ता बापापासून मुलाकडे अशी दोन पिढया चालत आली होती. पहिला स्वर्गाचा राजा युरॅनस, याला त्याचा पुत्र क्रॉनॉस याने पदच्युत केले, क्रॉनॉसला त्याचा पुत्र झ्यूसने. जर झ्यूसने थेटीसशी लग्न केले तर तिच्यापासून झालेला पुत्र झ्यूसला पदभ्रष्ट करणार होता. प्रॉमिथिअसने हे भवितव्य झ्यूसला सांगितल्यावर त्याने थेटीसचा विवाह पेलिअस राजाबरोबर करून दिला. त्यांचा पुत्र ॲकिलीज. याप्रमाणे झ्यूसने आपले भवितव्य टाळले व प्रॉमिथिअसला क्षमा करून मुक्त केले.

हा कथाभाग इस्किलसने तीन नाटकांत गोवला होता. पहिल्या नाटकात प्रॉमिथिअस अग्नी चोरतो. दुसऱ्या, म्हणजे सध्या उपलब्ध असलेल्या व "बद्ध प्रॉमिथिअस" या नाटकात झ्यूस रागावून प्रॉमिथि-

असला खडकाशी खिळवून टाकतो. तिसऱ्या नाटकात दोघांचा समेट होऊन प्रॉमिथिअस मुक्त होतो.

उपलब्ध नाटकात मधला कथाभाग– प्रॉमिथिअसला बद्ध केल्याचा– आहे. नाटकाच्या आरंभीच हेफिस्टर्स येऊन प्रॉमिथिअसला खिळवून जातो. गायिकावृंद ओशिनसकन्यांचा आहे. त्या प्रॉमिथिअसच्या यातनांबद्दल सहानुभूती दाखवतात. नंतर हीराच्या छळाची बळी झालेली, आयो येते, ती समदु:खी असल्यामुळे दोघे एकमेकांबद्दल अनुकंपा दाखवतात. इथे आयोच्या देशादेशांतील दीर्घ प्रवासाचे वर्णनही आहे. शेक्सपिअरच्या प्रेक्षकांप्रमाणे, ग्रीक प्रेक्षकांनाही नव्या नव्या देशांची, तेथील चमत्कारिक लोकांची, अनोख्या रीतिरिवाजांची वर्णने आवडत. दोघे एकमेकांना आपल्या कर्मभोगांची कहाणी ऐकवितात. प्रॉमिथिअस तिला याहूनही जास्त असह्य यातना भोगाव्या लागणार असल्याचे, आपल्या भविष्यज्ञानाच्या साहाय्याने सांगतो. आयोच्या व स्वत:च्या मुक्तीचे दूरगामी भविष्य, वृंदाच्या व आयोच्या आग्रहास्तव बरेच आढेवेढे घेतल्यावर प्रॉमिथिअस सांगतो. तेवढ्यात, झ्यूसचा दूत हर्मीज येतो व झ्यूसच्या पदच्युततेचे संकट निवारण्याची युक्ती विचारतो. प्रॉमिथिअसने ती सांगण्यास नकार देताच, त्याच्या यातना याहूनही भयंकर होतील अशी धमकी देऊन हर्मीज जातो.

याप्रमाणे एका साध्या कथेतून इस्किलसने एक तत्त्वचिंतनात्मक, भव्य, दिव्य शोकांतिका निर्माण केली. नाटकातले दृश्य कल्पनाशक्तीला केवळ थक्क करून टाकणारे आहे. अत्युच्च खडकाला खिळवलेला प्रॉमिथिअस, अफाट आकाश, विस्तृत भूप्रदेश व अथांग सागर यांची पार्श्वभूमी, भोवताली आक्रोश करणाऱ्या सागरकन्या. हे दृश्य ग्रीक रंगभूमीवर कसे साकार केले असेल, कोण जाणे; पण वाचताना अत:चक्षूंसमोर ते उभे राहिले, की भयचकिततेचा व एक प्रकारच्या अननुभूत, अद्‌भुत आनंदाचा साक्षात्कार होतो.

या चित्तथरारक नाटकामध्ये एक ज्वलंत, समर्थ विचार इस्किलसने गुंफला आहे. नाट्यत्रिपुटीत इस्किलसला दोन विरोधी तत्त्वांचे, दोन सत्यांचे द्वंद्व, टप्याटप्यांनी दाखवून शेवटी त्यांचा विवेकी समेट दाखवावयचा होता या मधल्या नाटकात झगडयाचा परमोच्च बिंदू आहे. झ्यूसच्या जबरदस्तीला प्रॉमिथिअस आपल्या मनोबलाने टक्कर देत आहे. एका जुलमी सत्तेविरुद्ध पुकारलेल्या बंडखोरीचा, हा झगडा म्हणजे एक प्रतीक आहे. अग्नी प्राप्त झालेले मानव आपल्याहून श्रेष्ठ होतील या भीतीने झ्यूसने प्रॉमिथिअसला शिक्षा केली. प्रॉमिथिअस मानवांचा कैवारी आहे. झ्यूस मानवाला तुच्छ मानतो; पण प्रॉमिथिअसला मानवाच्या उज्वल भवितव्याची व प्रगतीची खात्री आहे. ध्येयाने भारलेला प्रॉमिथिअस, सौख्याला झुगारून वैश्विक यातना भोगायला तयार आहे. प्रीती, भक्ती, सौंदर्यासक्ती या नीतिमूल्यांवरील श्रद्धेने त्याला धैर्य दिले आहे. साऱ्या जगाची त्याला सहानुभूती प्राप्त झालेली आहे. अग्नी प्राप्त करून देऊन प्रगतिमार्ग आपणास खुला करून देणाऱ्या व त्यासाठी यातना भोगणाऱ्या प्रॉमिथिअसबद्दल सर्वांना अपार दया आहे. अग्नी हे विवेचक बुद्धीचे प्रतीक आहे. ती बुद्धी मानवाला पशुसृष्टीतून उन्नत करते व अतिमानवतेची स्वप्ने पाहण्यास उद्युक्त करते.

या मधल्या नाटकात आयोला यातनांत कुजत ठेवणारा, प्रॉमिथिअसला राक्षसी शिक्षा देणारा झ्यूस– देवांचा देव– परमदयाळू व न्यायी कसा म्हणावा, अशी शंका वाचकांच्या मनात उद्‌भूत होते. परमेश्वर दयाळू व न्यायी आहे, तर जगात अन्याय व सज्जनांचा छळ का? हा प्रश्न सर्व धर्मांची डोकेदुखी होऊन बसलेला आहे. ख्रिश्चन धर्माने मानवांसाठी देवाकडे रद्‌बदली करणारा, त्याचे अपराध आपल्या मस्तकावर घेऊन दण्ड सोसणारा येशू ख्रिस्त निर्माण करून हा प्रश्न सोडवला आहे. हिंदू धर्मात देव सत्त्वपरीक्षा पाहतात व मानव कसोटीस उतरला, की त्याच्यावर कृपा करतात असे मानले जाते. इस्किलसने तिसऱ्या नाटकात झ्यूस व प्रॉमिथिअस यांचा समेट झाल्याचे दाखवले असावे. इस्किलस हा धर्मश्रद्ध होता. झ्यूस देव हा अनाकलनीय आहे. त्याची दूरगामी प्रज्ञा मानवांच्या बुद्धीपलिकडची आहे असे इस्किलस दाखवतो. झ्यूस हा स्वत: यातनांतून क्षमेचा धडा शिकला आहे. स्वत: शरणार्थी बनून, अनुभवाने



अनुक्रमणिका

आलेल्या शहाणपणातून तो शरणार्थ्यांचा साहाय्य-कर्ता बनला आहे असे इस्किलसचे मत आहे. या नाटचत्रिपुटीत अतिरेक त्यागून झ्यूस शेवटी मित्रता स्वीकारतो. तसेच प्रॉमिथिअसही आपला हट्ट सोडून झ्यूसला त्याच्या भवितव्याची कल्पना देतो.

प्रॉमिथिअस हा या नाटकाचा वीरनायक. अत्यंत सामर्थ्यवान. पृथ्वी व स्वर्ग यांपासून निर्माण झालेल्या बलिष्ठ टायटनांपैकी एक. पण इतर टायटनांत नसलेले सात्त्विक गुण व प्रज्ञा प्रॉमिअसमध्ये आहे. जुन्या सत्तेविरुद्ध बंड करण्यात नवोदित झ्यूसला त्याने मदत केली व नंतर तो मानवांचा कैवारी झाला. प्रॉमिथिअस हा सत्प्रवृत्त, न्यायी व जुन्या अतिरेकी सत्तेविरुद्ध उठावणी करणाऱ्या नव्या प्रेरणांचा पाठीराखा आहे. पृथ्वीचा पुत्र असल्यामुळे त्याला देवांबद्दल वाटते, तशी मर्त्य मानवाबद्दलही सहानुभूती आहे. पृथ्वीपासून प्राप्त झालेल्या भविष्य-ज्ञानाच्या शक्तीमुळे त्याला माहित आहे की, भविष्यात सत्य, न्याय, दया, स्वातंत्र्यप्रेम, विवेक या शुभ तत्त्वांचाच विजय होणार आहे, अविवेकी, दुष्प्रवृत्त शक्तींचा नाही; आणि म्हणून तो अशुभा-विरुद्ध अनंत, अमर्याद यातना सोसून झगडत राहतो. झ्यूस मानवांविरुद्ध अरेरावी करतो आहे अशी शंका आल्यावर त्याने अग्नी चोरून मानवांना दिला व त्यांना प्रगतीचा मार्ग शिकवला. प्रॉमिथिअसच्या भूमिकेशी वाचक पूर्णपणे सहमत होतात व त्यामुळे प्रॉमिथिअसविषयी आदर, करुणा व त्याच्या अपरंपार यातनांविषयी भयचकितता त्यांच्या ठायी उत्पन्न होते; पण झ्यूसची अशीही एक बाजू आहे. त्याचा दूत हर्मीज, भविष्य सांगितल्यावर, झ्यूस त्याची सुटका करील असा निरोप घेऊन येतो; पण प्रॉमिथिअस आपलाच हट्ट चालवतो. झ्यूसवरचे संकट टाळण्याची त्याला इच्छा नाही. सागर-कन्यावृंदही त्याला त्याच्या हट्टाबद्दल दोष देतो व सामोपचाराने वागण्यास सांगतो. पण आपल्या हटवादीपणाने प्रॉमिथिअस अखेर आपल्या यातना वाढवून घेतो, लोककथेप्रमाणे एक गरुड प्रत्यही त्याचे मांस कुरतडून खातो; रात्री जखमा भरून येतात व दुसऱ्या दिवशी गरूड पुन्हा ते मांस कुरत-डतो. प्रॉमिथिअस देवांश असला, तरी तो आपल्या पुढे येतो तो यातनांनी सामान्य माणसासारखा तळ-मळत असलेला. त्याने मानवांचा कैवार घेऊन मानवांचे दुःख आपणावर ओढवून घेतले आहे व येशू ख्रिस्ताप्रमाणे तो विवळत आहे.' त्याला भविष्यज्ञान आहे. तेरा पिढ्या उलटल्यानंतर आपण मुक्त होणार आहो हे त्याला ठाऊक आहे; पण आपणापुढे मात्र तो यातनांचे भक्ष्य झालेला असा दिसतो व आपल्याला करुणा व भयकातरता यांनी भारावून टाकतो.

आयो ही देवांच्या रोषामुळे वाटचास आलेल्या यातनांची दुसरी बळी. तिला पण अत्यंत दूरस्थ अशी सुटकेची आशा आहे; पण या क्षणी हीराने मागे लावलेल्या गांधीलमाशीच्या डंखाने वेडीपेशी होऊन ती देशोदेशी वणवण फिरते आहे. आयो ही स्त्री जातीची प्रतीक आहे. स्वजातीयांचा मत्सर, पुरुषजातीकडून त्यांची होत असलेली सत्त्वपरीक्षा व प्रीतीने जन्माचे साफल्य झाल्यानंतरही वंश-वृद्धीसाठी सोसाव्या लागणाऱ्या वेदना– हे सारे स्त्रियांचे कर्मभोग तिच्या जीवनांत प्रतिबिंबित झालेले आहेत, तिसऱ्या नाटकात आयोच्या यातना-मुक्तीचा कथाभाग आला आहे किंवा नाही हे समजण्यास आधार नाही. आयोची, स्वतः यातना-ग्रस्त असतानाही प्रामिथिअसबद्दलची अनुकंपा हृदयस्पर्शी आहे. प्रॉमिथिअसला पुढे मुक्त करणारा हेरॅक्लीज याची परोपकारी वृत्ती ही प्रामिथिअस-प्रमाणेच विख्यात होती.

इस्किलसच्या नाटकांपैकी 'बद्ध प्रॉमिथिअस' हे इंग्लिश वाचकाना जास्त परिचित आहे. याच कथेवर एकोणिसाव्या शतकात इंग्लिश कवी शैली याने आपले 'मुक्त प्रॉमिथिअस' हे काव्यबद्ध नाटक लिहिले.

'ऑरेस्टिआ ही शोकनाटचत्रिपुटी इस्किलसने इ. स. पू. ४५६ मध्ये तो मरण पावला. 'ऑरे-स्टिआ' त्याच्या मरणानंतर दोन वर्षांनी रंगमंचावर आले.

'आरेस्टिआ' तील पहिले नाटक, अॅगमेम्नॉन. यात ट्रॉयची लढाई जिंकून अॅगमेम्नॉन कॅसँड्रा या ट्रॉयच्या राजकन्येला बंदिनी म्हणून समवेत घेऊन, विजयोत्सवाने नगरीत प्रवेश करतो. त्याची पत्नी क्लायटेम्नेस्ट्रा त्याचे बाहेरून मोठ्या आनंदाने, त्याची खुषामत करीत, भव्य

स्वागत करते. पण तिच्या पोटात द्वेष आहे. ॲगमेम्नॉनच्या अनुपस्थितीत तिने इजिस्थस या आपल्या चुलत–दिराशी प्रेमसंबंध ठेवला आहे. ॲगमेम्नॉनने त्यांची मुलगी इफीजिनिआ हिला ट्रॉयच्या प्रवासाला अनुकूल असे वारे वहावे म्हणून आर्टेमिसला बळी दिले होते- त्यामुळेही क्लायटेम-नेस्ट्रा चिडली आहे. ॲगमेम्नॉनवर सूड उगवण्या-साठी ती त्याचा, स्नानपात्रात, निःशस्त्र असा तो असताना खून करते. इजिस्थसने हा कट योजलेला असतो. त्यालाही ॲगमेम्नॉनवर सूड उगवायचा असतो. कारण ॲगमेम्नॉनचा पिता ॲट्रिअस याने इजिस्थसचा पिता थिएस्टीस याला त्याच्या अप-त्यांचे मास खाऊ घातलेले असते.

दुसरे नाटक "कोईफोरी"–म्हणजे अर्घ्यधारिका या नाटकात ॲगमेम्नॉनचा पुत्र ऑरेस्टीज हा पर-देशाहून परत येऊन, आपली बहीण इलेक्ट्रा हिच्या साहाय्याने क्लायटेम्नेस्ट्रा व इजिस्थस यांना ठार करून पितृवधाचा सूड उगवतो. तिसरे नाटक 'युमेनाइड्स' म्हणजे 'दयादेवता'; मूळच्या या क्रोधदेवता (फ्यूरीज); आप्तरक्त सांडल्यामुळे क्लायटेम्नेस्ट्राच्या या कैवारी देवता ऑरेस्टीजला शिक्षा करण्यास उद्युक्त होतात. ॲपोलोने हा सूड घेण्याचा आदेश ऑरेस्टीजला दिलेला असल्यामुळे ऑरेस्टीज डेल्फीला ॲपोलोकडे धाव घेतो. ॲपोलो त्याला अथेन्सला अथीना देवीकडे न्याय मागण्या-साठी पाठवतो. अथेन्सच्या बारा पंचांपुढे न्याय होतो व ऑरेस्टीज निर्दोष ठरतो. क्रोधदेवतांची ॲथीना समजूत घालते व त्या दयादेवता बनून अथेन्समध्ये राहतात.

आर्गॉसच्या राजघराण्याच्या इतिहासविषयक लोककथांतून इस्किलसने आपल्या प्रतिभेने ही तीन अप्रतिम शोकनाटचे निर्माण केली. ॲगमेम्नॉनच्या खुनाची कथा होमरच्या ओदिसीत आहे. दुसऱ्याही, पिंडार वगैरे ग्रीक कवींनी या लोककथांवर काव्ये गुंफली होती; पण इस्किलसने या लोककथेकडे पहाण्याचा स्वतःचा असा एक दृष्टिकोन वापरून, एक शाश्वत, विश्वात्मक तत्त्वज्ञान या त्रिपुटीत ग्रथित केले.

मुळात ही एक कौटुंबिक शोकान्तकथा; परंतु कुटुंब राजाचे असल्यामुळे ती राजवंशीय शोककथा झाली. इस्किलसने आपल्या मनोवगाहन-कौशल्याने या शोककथेतील पात्रांच्या मनोव्यापारांचे व त्यांच्या कृतींमागील अंतस्थ हेतूंचे धागे उलगडून दाखवले. व्यक्तिगत सूडांच्या उद्दिष्टांना त्याने ट्रॉयच्या रण-कंदनामागील हेलनच्या अपहरणाबद्दलच्या सूडाची भव्य, भीषण पार्श्वभूमी दिली. हेलन क्लायटेम्नेस्ट्राची बहीण; तिच्यामुळे ट्रॉयचे युद्ध उद्भवले, त्या युद्धा-प्रीत्यर्थ ॲगमेम्नॉनला इफीजिनिआचा बळी द्यावा लागला, तो राग धरुन क्लायटेम्नेस्ट्राने पतीचा खून करून, मृत अपत्यांबद्दलचा बदला घेताना, हयात अपत्यांचे वैर पदरात घेतले. त्या वैरापायी तिचा स्वतःचा व तिच्या प्रियकराचा वध झाला. याप्रमाणे ही विरोध, द्वेष, प्रीती, सूड, प्रतिरोध अशी साखळी गुंफून शेवटी तिसऱ्या नाटकात विवेक, सामंजस्य यांचा विजय झालेला इस्किलसने दाखविला आहे.

परिणामी ही निव्वळ कौटुंबिक शोकात्मिका न रहाता, राष्ट्रांची शोकात्मिका झाली. ॲगमेम्नॉनने एका व्यक्तीसाठी आपल्या प्रजेचे व साऱ्या ग्रीक राष्ट्राचे रक्त सांडले. ट्रोजनांनी पॅरिसच्या आगळि-कीकडे काणाडोळा करून हेलनला खुशाल ठेवून घेतले व त्या अपराधाची त्यांना प्रमाणाबाहेर, सर्वनाशाची, शिक्षा भोगावी लागली. ॲगमेम्नॉन पहिल्या नाटकात मोठचा डौलाने, विजयश्री मिरवीत, नगर-प्रवेश करतो. पण त्याच्याबरोबर फक्त एक जहाज व थोडे सैनिक परतले आहेत. बाकीचे प्रचंड आरमार, त्यांच्या खलाशांसह, सैनिकांसह सागराने गिळंकृत केले आहे. श्रेष्ठी-वृंदाच्या वक्तव्यात हा दृष्टिकोण व्यक्त होतो. ट्रॉयवरची स्वारी ही राष्ट्रहिताच्या दृष्टीने मोठी चूक होती, असे नागरिकांचे पूर्वी मत होतेच. या क्षणी राजनिष्ठेला जागून ते जरी त्याची स्तुतिस्तोत्रे गात असले तरी वेढयाच्या दहा वर्षांत रणी पडलेल्या ग्रीक वीरांचे वृत्तांत व मृतांची रक्षापात्रे आर्गॉस-मध्ये जेव्हा सारखी येत राहिली होती तेव्हा नगरीत क्रोधाचे, राजाविरुद्धच्या चिडीचे केवढे प्रचंड वादळ उद्भवले असेल याची कल्पना वृंदाच्या भाषणांवरून येते. त्या चळवळीचा फायदा घेऊनच इजिस्थसने क्लायटेम्नेस्ट्रावर व राज्यावर आपली पकड बसवली होती. "शोध घे राजा, कोण तुझ्याशी एकनिष्ठ आहेत व कोण तुझ्याविरुद्ध उठले आहेत"

अशी स्पष्ट सूचना वृंद ॲगमेम्नॉनला देतो. पण ॲगमेम्नॉन आपल्या विजयाने, व ट्रॉयमध्ये मिळालेल्या लुटीने एक प्रकारच्या मस्तीत आहे, आपल्या हातून जाणता अजाणता घडलेल्या अपराधांमुळे आपल्याविरुद्ध उठलेल्या शक्तींची त्याच्या फुगलेल्या अहंकाराला, वैभवाच्या धुंदीला जाण नाही. त्याबद्दलची स्पष्ट सूचना वृंद देत असतानाही तो राणीच्या खोट्या खुषामतीला बळी पडतो व आपल्या पायांनी मृत्यूकडे चालत जातो. राजकारणाची ही शोकांतिका युद्धाच्या शोकांतिकेप्रमाणेच मूळ कौटुंबिक शोकांतिकेला एक भव्य. सर्वव्यापी परिमाण प्राप्त करून देते.

'ॲगमेम्नॉन' हे सध्या उपलब्ध असलेल्या ग्रीक शोकात्मिकांत सर्वांत प्रदीर्घ व सर्वोत्कृष्ट नाटक मानले जाते. कथानकात भाग्याची उलटापालट व सत्यस्थितीची प्रखर जाणीव, करुणा व भयचकितता या रसांची अत्यंत परिणामकारकतेने निष्पत्ती करते, प्रारंभी अहंकाराने फुगलेला, फाजील आत्मविश्वासात गुरफटलेला ॲगमेम्नॉन भाग्याच्या शिखरावर असलेला दिसतो; पण शेवटी दीनासारखा विश्वासघाताचा असहाय्य बळी होऊन त्याच्या जीवनाची अखेर होते. आपल्याविरुद्ध उठलेल्या शक्तींची जीवघेणी जाणीव त्याला अखेरच्या क्षणी होऊन तो आक्रंदतो. "अरे, एकदा नव्हे, दोनदा जीवघेणा वार पडला माझ्यावर." घटिते थोडी, पण ती घडण्यापूर्वी प्रेक्षकांची उत्कंठा अत्यंत कौशल्याने ताणीत नेली आहे व त्यामुळे नाट्यगुणाचा परमोत्कर्ष झाला आहे.

नाटकाचा आरंभच होतो एका उत्कट, उत्कंठापूर्ण क्षणी. आर्‌गॉसच्या राजमहालाच्या सौधावर, सतत दहा वर्षे रात्री पहारा देणारा पहारेकरी, ट्रॉयवरच्या ग्रीकांच्या विजयाच्या खुणेच्या मशाली पेटण्याची प्रतीक्षा करीत आहे. तो राजाच्या आगमनाची उत्सुकतेने वाट पहात आहे; पण राज्यात घडणाऱ्या काही घटनांमुळे काहीसा अस्वस्थ आहे. त्याच्या भाषणातून व नंतर प्रवेश करणाऱ्या श्रेष्ठीवृंदाकडून कथानकाची पार्श्वभूमी स्पष्ट होते. नंतर क्लायटेम्‌नेस्ट्रा ट्रॉयवरच्या विजयाची बातमी देते. ॲगमेम्नॉनचा अग्रदूत ॲगमेम्नॉन जवळ येऊन ठेपल्याचे सांगून, ट्रॉयचे रणकंदन व नंतरची ग्रीकांच्या जहाजांची वाताहत यांचे वर्णन करतो. ॲगमेम्नॉन कॅसँड्रासह येतो. क्लायटेम्‌नेस्ट्रा त्याचे स्वागत करून त्याला आत नेते. श्रेष्ठीवृंद राजाच्या आगमनाने आनंदित पण अशुभाच्या चाहुलीने अस्वस्थ आहे. असा आनंददुःखाचा, शुभाशुभाचा खेळ, प्रेक्षकांची उत्कंठा अधिकाधिक उत्कट करीत अखेरीपर्यंत चालू रहातो. ॲगमेम्नॉनच्या मृत्यूसमयीच्या किंकाळ्या, क्लायटेम्‌नेष्ट्राचे श्रेष्ठींसमोर आपल्या कृत्याचे समर्थन, इजिस्थसचा आसुरी आनंद, हे सर्व पहाता पहाता, पुढे काय होईल, अशा वाचकांच्या उत्कंठेतच नाटक संपते.

इस्किलसचे नाट्यतंत्रातले कसब, त्याच्या कथानक-रचनेत तसे त्याच्या पात्रांच्या स्वभावरेखनांतही प्रकट होते. त्याची सर्वच पात्रे प्रत्ययकारी व वास्तवाशी इमान राखणारी अशी आहेत.

या शोकनाट्याची नायिका आहे क्लायटेम्‌नेस्ट्रा. हिच्या गुंतागुंतीच्या, सूक्ष्म मनोव्यापारांचे चित्रण करताना इस्किलसने आपले मनुष्यस्वभावाचे सारे ज्ञान जणू पणास लावले आहे. तसेच त्याने आपल्या नेहमीच्या भव्य धर्तीवर तिचे व्यक्तिचित्र रेखाटले आहे, ती प्रखर व्यक्तिमत्त्वाची आणि खानदानी ढंगाची आहे. तिच्या प्रत्येक हालचालीत, प्रत्येक शब्दात डौल आहे, प्रतिष्ठेचे अधिष्ठान आहे. ती श्रेष्ठींच्या पुढे आपल्या पातिव्रत्याचे खोटे प्रदर्शन करीत असो, ॲगमेम्नॉनची लटकी खुषामत करून त्याला झुलवीत असो, वा खुनानंतर श्रेष्ठींच्या पुढे बेडरपणे, आपल्या घोर कृत्याचे निलाजरे समर्थन करीत असो, -तिच्या जबरदस्त व्यक्तित्वाची मोहिनी राजावर व श्रेष्ठींवर पडते. खुनापूर्वीही तिच्याबद्दल मनात विकल्प असूनही श्रेष्ठी तिच्यापुढे तिची स्तुतिस्तोत्रे गातात. तिने केलेल्या भडक स्वागताबद्दल ॲगमेम्नॉन तिला बोल लावतो; पण शेवटी तिच्या स्तुतीला भुलून देवांना समर्पणीय अशा बहुमोल, पवित्र गालिच्यावरून चालत, मृत्यू-मुखात प्रवेश करतो.

पण बाहेरून चालण्याबोलण्यातला खानदानी संयम ती संभाळीत असली, तरी तिच्या अंतःकरणात उसळणाऱ्या परस्परविरोधी भावनांचा कल्लोळ इस्किलसने अत्यंत कुशलतेने सूचित, व पुढे व्यक्तही केला आहे.

अनुक्रमणिका

नाटकाच्या आरंभी श्रेष्ठीवृंद प्रवेश करून ट्रॉयच्या वेढ्याची पार्श्वभूमी कथन करीत असताना, ती रंगमंचावर प्रवेश करून स्तब्ध अशी किती वेळ तरी त्यांचे लांबलचक कथन ऐकत उभी असते. केवढा गदारोळ माजला असावा तेव्हा तिच्या मस्तकात! ॲगमेम्नॉन विजयी झाल्याच्या खुणांच्या पेटत्या मशाली ती नुकतीच पाहून आली आहे व विजया-बद्दल कृतज्ञता दर्शवणारे यज्ञयाग करण्याचे आदेश तिने देऊन टाकले आहेत. पण त्याच्या दहा वर्षांच्या अनुपस्थितीत तिने राज्यावर आपली सत्ता प्रस्था-पित केली आहे व इजिस्थसला आपल्या प्रीतीचा व सत्तेचा वाटेकरी करून टाकले आहे. आता अँगमेम्नॉन आल्यावर काय होईल? त्याने तिच्या कन्येचा बळी दिला आहे- त्याच्याबद्दल तिच्या मनात सूडाची ज्वाळा पेटली आहे. ती ज्वाला भीषण कृत्याचे विचार तिच्या मनात चेतवीत आहे; पण ती धाडसी, करारी, मनस्वी स्त्री थोड्याच वेळात मनाशी आपला विचार पक्का करते व त्याच्या कार्यवाहीला प्रारंभ करते. सद्-गुणाचा, गाढ प्रीतीचा, निष्ठेचा मुखवटा तोंडावर चढवून ती ॲगमेम्नॉनची फसवणूक करते व शेवटी त्याचा घात करते. राजावर धावामागून धाव घाल-ताना क्षणभर तिच्या हाताला कंप सुटला असेल का? सुप्त अशी पतीबद्दल प्रीती तिच्या हृदयात कुठेतरी कोपऱ्यात शिल्लक असली पाहिजे. नाहीतर कॅसॅन्ड्राबद्दल, ट्रॉममधल्या त्याच्या सख्यासोबतीणीं-बद्दल तिला मत्सर वाटला नसता. पडद्यामागे पतीचा खून करून ती बाहेर येते तेव्हा मात्र तिचा संयम सुटल्यासारखा वाटतो. एक प्रकारच्या उन्मा-दात ती श्रेष्ठींसमोर आपल्या पापकृत्याची शेखी मिरवते. का केला होता खून तिने? आपल्या हेतूंबद्दल तिच्या मनात गोंधळ आहे. दुखावलेली माता, मत्सरी पत्नी, पति-प्रेमाला तिलांजली देऊन परपुरुषाशी रत झालेली प्रियकरीण,- या अशा भूमिकांवरून आपण पतीवध केला, असे ती स्वतःला व श्रेष्ठींना भासवते. आपणाला सत्तेची अभिलाषा नाही, आपण फक्त या घराण्यावरचा कलंक धुऊन काढला; आता आपण निरभिमानी जीवन जगणार आहो असा ती आव आणते; पण इजिस्थस आल्याबरोबर तिचा सूर बदलतो व त्याच्या समवेत वैभव व सत्ता उपभोगण्याची स्वप्ने ती पाहू लागते.

ॲरिस्टॉटलने शोकनाट्यातील स्वभावरेखना-बद्दल म्हटले आहे, की स्त्रिया स्त्रीसहज गुणांनी युक्त असाव्या- कोमल, दुबळ्या, परावलंबी, पतिनिष्ठ. पण इस्किलसने क्लायटेम्नेस्ट्राच्या व्यक्तिचित्रात हा संकेत मोडून तिला एक विलक्षण, चाकोरीच्या बाहेरची अशी स्त्री बनवली आहे. वीर-कर्तृत्व-प्रमुख युगात (हिरोइक एज) स्त्रिया वीरांपुढे नमून असतात. कॅसॅन्ड्रासुद्धा ॲगमेम्नॉनच्या वीरश्रीला वश झाली होती. वीरपुरुषांनी शत्रूंच्या स्त्रिया एक प्रका-रची लूट म्हणून आणून आपल्या अंतःपुरात ठेवाव्या ही ग्रीकांची पद्धतच होती; पण क्लायटेम्नेस्ट्रा या पद्धतीचा निषेध करून मत्सराने पेटते. हेलन जशी खुशाल ट्रॉयमध्ये पॅरिसची प्रियकरीण म्हणून राहिली, तशी तिची ही बहीण, ग्रीक स्त्रियांच्या पतिनिष्ठेच्या ब्रीदाला कलंक लावून व्यभिचार करते. पुरुषासारखे कर्तृत्व गाजवून ती राज्यकार-भार चालवते व कारस्थान रचून पार पाडते.

पण ही सगळी लोकविलक्षण लक्षणे क्लाय-टेम्नेस्ट्राच्या चित्रात प्रभावी रंग भरीत असली, तरीही ती तिच्या कृत्याचे समर्थन करण्यास उप-योगी पडत नाहीत. शेवटी अँगमेम्नॉनच्या शवा-पाशी उभी राहून निलाजरेपणाने ती प्रौढी मिरवते तेव्हा तिच्याबद्दल घृणाच वाटते.

अँगमेम्नॉनचे व्यक्तिमत्त्व तितकेसे गुंतागुंतीचे नाही. तो थोर राजा, शूर सेनानी, धर्मनिष्ठ व कौटुंबिक लागेबांधे जपणारा असा आहे. पहारेकरी त्याच्या येण्याची वाट पहातो. श्रेष्ठी त्याच्यावर प्रेम करतात. त्याची ट्रॉयवर स्वारी ही चूक होती असे त्यांना वाटते; तरी तो यशस्वी होऊन आल्यावर त्यांना आनंद होतो. जुलमी, अवैध राज्य संपून आता वैध राज्यसत्ता आली याचा त्यांना संतोष होतो. पण या विज-याच्या क्षणी ॲगमेम्नॉन फाजील अहंकाराने व वैभवाच्या मदाने फुगला आहे. त्याच्या नावातल्या 'ॲगॅ' या ग्रीक शब्दाचा अर्थ "अतिरेकामुळे नियतीचा कोप" असा आहे. तो आता अनुभवास येतो. आपल्या कृत्यामुळे मृत्यू पावलेल्या हजारो ग्रीकांची, समूळ उखडल्या गेलेल्या ट्रॉयची व

स्वतःच्या बळी गेलेल्या कन्येचीही त्याला या क्षणी आठवण नाही. तो आपल्याच अफाट कर्तृत्वात, आपल्या पराक्रमात गर्क आहे, आपल्यासारख्या समर्थ राजवंशीयाच्या आप्ताचे अपहरण करणाऱ्याला यथायोग्य घोर दण्ड करून, व शत्रूच्या स्त्रियांची व धनाची लूट करून तो परतला आहे. श्रेष्ठींनी "नगरी पादाक्रांत करणारा" या अत्युच्च पदवीने त्याचे स्वागत केल्यावर तो खुशालला आहे. 'मला खुशामत आवडत नाही' असे म्हणता म्हणता तो खुशामतीच्या जाळ्यात सापडून, परलोकची वाट धरीत आहे. श्रेष्ठीवृंद अहंकार, तकलादू वैभव यांच्याबद्दल धोक्याची सूचना त्याला देत आहे, याकडे त्याचे लक्षही नाही.

अहंकाराच्या पोटी उद्भवलेली ही बेफिकिरी, ही स्वभावातली त्रुटी त्याच्या जीवनाचा शोकांत करते. एकेकाळचा सत्ताधीश, शत्रूंना खडे चारणारा हा शूरवीर असहाय्यपणे एका स्त्रीच्या, आपल्या पत्नीच्या हाताने ठार झालेला पाहून करुणा व कातर विस्मय यानी वाचकाचे अंतःकरण भारावून जाते.

श्रेष्ठीवृंद या नाटकात जणू एक क्रियाशील पात्र असल्याप्रमाणे वावरतो; कथानकाची पार्श्वभूमी स्पष्ट करून ॲगमेम्नॉनच्या अनुपस्थितीत नगरीत उडालेल्या खळबळीचे सूचक कथनही तो करतो. विजयी राजाचे स्वागत करून, विरोधी शक्तींची त्याला सूचना देऊन, फाजील अहंकार, नकली वैभव यांपासून त्याला सावध रहाण्यास सांगतो. क्लायटेम्नेस्ट्राची वागणूक पसंत नसली, तरी तिच्या प्रखर व्यक्तिमत्त्वापुढे तो दबतो; पण तिने पतिहत्या केल्यावर मात्र तिचा कठोर शब्दांनी निषेध करतो. क्लायटेम्नेस्ट्राच्या अघोरी कृत्यांनी हर्षित झालेल्या इजिस्थसला तो नागरिकांच्या प्रकोपाची धमकी देतो. इजिस्थस श्रेष्ठींना पकडायचा प्रयत्न करतो, तेव्हा ते तलवारी उपसून प्रतिकार करायला सज्ज होतात. पण क्लायटेम्नेस्ट्रा त्यांना शांत करते. आर्गॉसचे नागरिक दुरात्म्याच्या पायाशी लोळण घेणार नाहीत, असे परखड उत्तर त्यांनी दिले, तरी ऑरेस्टीजची मार्गप्रतीक्षा करीत रहाणे जास्त शहाणपणाचे समजून ते गप्प रहातात.

वृंदगीतात इस्किलसचे तत्त्वचिंतन प्रगट झालेले आढळते. वृंदाच्या पहिल्याच गीतात नाटकात पुढे घडणाऱ्या अशुभाची सूचना पण अखेरीस सत् तत्त्वाचा जय होईल अशी आशा व्यक्त केली आहे. आपल्या नाट्यत्रिपुटीत इस्किलसने दाखवून दिले आहे की, अनेक दुःखद घटना घडल्या: ॲगमेम्नॉन, कॅसॅन्ड्रा, क्लायटेम्नेस्ट्रा, इजिस्थस, यांची हत्या झाली, तरी शेवटी ऑरेस्टीज निर्दोष ठरून त्याला त्याचा वारसा मिळाला; सत् तत्त्वांचा जय झाला. पण 'ॲगमेम्नॉनमध्ये' 'अवैध वैभव' या संकल्पनांवर वृंद भर देतो. ॲगमेम्नॉनला मृत्युदंड केला तो अतिरेक सहन न होणाऱ्या, वैश्विक शक्तींनीच. क्लायटेम्नेस्ट्रा ही फक्त त्या शक्तीचे एक साधन झाली.

इस्किलसची भाषाशैली इतर नाटकांप्रमाणेच या नाटकातही प्रभावी, डौलदार असून कल्पकतेचा व प्रतिभेचा मनोरम आविष्कार तिच्यात प्रत्ययास येतो. चटकदार, नाट्यपूर्ण संवाद व काव्यमय वृंदगीते यांच्या जोडीला परिणामकारक दृश्येही आहेत. राजमहालाच्या सौधावरून बोलणारा पहारेकरी, रथारूढ ॲगमेम्नॉन व कॅसॅन्ड्रा, बहुमोल गालिच्यावरून चालणारा ॲगमेम्नॉन, चाके लावलेल्या छोट्या मंचावरून आणलेली ॲगमेम्नॉन व कॅसॅन्ड्रा यांची शवे– अशा दृश्यांनी प्रेक्षक प्रभावित झाले असतील यात शंका नाही.

नाट्यत्रिपुटीतील दुसरे नाटक "कोईफोरी" म्हणजे 'अर्घ्यधारिका' या नाटकात ॲगमेम्नॉनचा पुत्र ऑरेस्टीज हा देशांतराहून परत येऊन पितृवधाचा सूड, क्लायटेम्नेस्ट्रा व इजिस्थस यांना ठार मारून उगवतो असा कथाभाग आहे. त्याची बहीण इलेक्ट्रा या कामी त्याला सहाय्य करते. याच कथाभागावर सोफोक्लीज व युरायपिडीज यांनी नाटके लिहिली आहेत व त्यांना 'इलेक्ट्रा' असे नाव दिले आहे; कारण त्या नाटकात ऑरेस्टीजला प्रेरणा देणारी इलेक्ट्रा होती. पण या नाटकात, 'अर्घ्यधारिका' म्हणजे ॲगमेम्नॉनने पकडून आणलेल्या व आता गुलाम झालेल्या ट्रोजन स्त्रिया यांचा भाग, सूड घेण्याच्या कामात मोठा आहे. एक तर क्लायटेम्नेस्ट्राने मृतात्म्याला संतुष्ट करण्यासाठी पाठवलेले अर्घ्य, म्हणजे समर्पण द्रव्ये, ॲगमेम्नॉनच्या कबरीवर

व्हाण्यासाठी त्या रंगमंचावर येतात, व या अर्घ्याने मृतात्मा जागृत व शक्तिमान होतो असे नाटकात भासवले आहे. पहिल्या नाटकातल्या काही कृतापराधांसाठी शत्रूंनी ठार केलेल्या अॅगमेम्नॉनचा या नाटकात विसर पाडण्यात आला आहे. या नाटकातली त्याच्या मृतात्म्याची प्रतिमा, अत्याचाराचा, अनैसर्गिक अन्यायी कृत्यांचा बळी अशी आहे. मुलांच्या प्रार्थनेने, विनवणीने तो आपल्या मारेकऱ्यांस शिक्षा देण्यास प्रवृत्त झाला आहे, असा भास सर्व नाटकभर सारखा होत रहातो. त्याचे पिशाच्च प्रत्यक्ष रंगमंचावर प्रकट होत नाही; पण तो सूडाची प्रेरणा आहे, कर्ताकरविता तोच आहे. असे मात्र निश्चित वाटते, ऑरेस्टीज, इलेक्ट्रा ही फक्त त्याने वापरलेली साधने आहेत. अर्घ्यधारिकावृंदही सतत त्या मृतात्म्याची प्रार्थना, विनवणी करून मुलांना साहाय्य करण्यासाठी त्याला जागरूक रहाण्यास सांगत असतात, यामुळे या नाटकाला इस्किलसने 'अर्घ्यधारिका' हे नाव दिले असावे.

नाटकाचे कथानक कौशल्याने रचून, नाट्यपूर्ण असे खुलवीत नेले आहे. सबंध नाटक व्यापून टाकणारी सूडाची कथावस्तू नाटकाच्या अगदी आरंभीच मांडली जाते. ऑरेस्टीज पित्याच्या समाधीला वंदन करून त्याच्या मृत्युबद्दल शोक करताना, हर्मीजला, आपला वारसा आपल्याला मिळवून देण्याबद्दल व झ्यूसला, पितृवधाबद्दल सूड घ्यावयास साहाय्य करण्यासाठी प्रार्थिताना दिसतो. मग अर्घ्यधारिका व इलेक्ट्रा येतात व अॅगमेम्नॉनवर विश्वासघाताने झालेल्या अत्याचारांचा व त्याच्या शवाच्या विटंबनेबद्दलचा सारा इतिहास त्यांच्या भाषणांतून वाचकांना व ऑरेस्टीजला समजतो. मग सूडाच्या योजना क्रोधावेशात व देवांच्या प्रार्थनासमवेत आखल्या जातात. मृतात्म्याला सूडास साहाय्य करण्याबद्दल जोरदार चेतवणी चालूच असते. मग परदेशी पाहुण्यांचे सोंग घेऊन ऑरेस्टीज व त्याचा मित्र पायलेड्ज क्लायटेम्नेस्ट्राला ऑरेस्टीजच्या मृत्यूची खोटी बातमी देतात, शेवटचा शत्रू मेला म्हणून क्लायटेम्नेस्ट्रा इजिस्थसला आनंदाने बोलावणे पाठवते; पण शेवटी दोघांना हे दोघे ठार मारतात. घराण्यातले पाप धुऊन गेल्याचा आनंद ऑरेस्टीज मानतो न मानतो तोच, क्रोधदेवता आप्तरक्तपाताबद्दल त्याला शिक्षा देण्यासाठी धावून येताना त्याला दिसतात व तो बेभान, घाबराघुबरा होऊन आश्रयासाठी डेल्फीला, अॅपॉलोकडे धाव घेतो. या शेवटच्या प्रवेशात नाट्योत्कर्षाची परमावधी झाली आहे. ऑरेस्टीज अॅगमेम्नॉनचा रक्ताने भरलेला, घावांच्या खुणा असलेला झगा सर्वांना दाखवतो व आपल्या कृत्याचे समर्थन करतो; पण लगेच क्रोधदेवतांचे दर्शन होऊन, बेभान होऊन तो पळ काढतो. वृंद दुःखाने म्हणतो, "या घराण्यावरचा हा तिसरा आघात— पहिला थिएस्टिसने आपल्याला अपत्यमांस खाऊ घातल्याबद्दल अॅट्रिएसच्या घराण्याला दिलेला शाप, दुसरा अॅगमेम्नॉनचा खून, व तिसरा क्लायटेम्नेस्ट्रा व इजिस्थस यांचा वध. देवा, या साऱ्याचा शेवट तरी काय होणार ? नियतीचा क्रोध केव्हा शमणार ?"

एकंदर नाटकात, सूडाचे कारस्थान व त्याची यशस्वी परिणती हे कथानक उलगडले जात असताना उत्कंठा व नाट्य यांचा सारखा अधिकाधिक परिपोष होत राहतो.

ऑरेस्टीज हा सूड घेणारा म्हणजे मुख्य पात्र. त्याच्या अंगी पितृनिष्ठा, भगिनीप्रेम व कुटुंबाबद्दल आस्थाच आहे. आपला न्याय्य वारसा हस्तगत करण्याची त्याला ईर्षा आहे. मात्र ही कामगिरी करताना कराव्या लागणाऱ्या मातृवधाबद्दलची कातरता व अॅपॉलोच्या आज्ञाभंगाची भीती या दोन भावनांचा त्याच्या मनात संघर्ष सुरू झालेला आहे. अॅपॉलोने त्याला मातृवध करण्याचा आदेश दिला आहे. तो करणार आहे ते न्याय्यच आहे असे अर्घ्यधारिका व इलेक्ट्रा त्याला वारंवार बजावीत रहातात. त्याचा मित्र पायलेड्सही त्याला तेच सांगतो व त्याच्या पित्याचा मृतात्मा, (हॅम्लेटच्या पित्याप्रमाणे) कबरीतून सूडाची मागणी करीत आहे, असे त्याला सारखे वाटत राहते. तो शेवटी मातृवध करतो, आपल्या कृत्याचे समर्थनही करतो, पण क्रोधदेवता त्याच्यापुढे प्रगट होतात व त्यांच्या भीतीने, नुकत्याच मिळालेल्या वारसा हक्काचा त्याग करून त्याला पळ काढावा लागतो.

इलेक्ट्राला या नाटकात इतकेसे महत्त्व नाही. पितृवधामुळे, आईच्या व्यभिचाराने व घरात

सोसाव्या लागणाऱ्या अपमानाने ती खवळली आहे खरी, पण बंधुप्रेमाच्या मार्दवाने तिच्या व्यक्तिचित्रात सौम्यता आली आहे. न्याय मिळवून देण्यासाठी ती देवांची प्रार्थना करते, मृत पित्याच्या आत्म्याला साद घालते व भावाला उत्तेजन देते. पण नंतर कटाची गुप्तता राखण्यापलीकडे ती प्रत्यक्ष काही करीत नाही. नाटक अर्धे होईपर्यंत तिचा आवाज कानावर पडतो; पण उरलेल्या अर्ध्या भागात तिच्या तोंडी एकही भाषण इस्किलसने घातलेले नाही.

क्लायटेम्नेस्ट्रा पहिल्या नाटकातल्याप्रमाणे इथेही खानदानी भारदस्तपणाने वावरते. मात्र मनातून अशुभसूचक दुःस्वप्नामुळे ती घाबरली आहे व पतीच्या समाधीवर समर्पण द्रव्ये वाहून त्याच्या मृतात्म्याला शांतवू पहात आहे. पण अभ्यागतांचे स्वागत ती नेहमीच्या डौलदारपणे करते. पुत्राच्या मृत्युवार्तेने तिला धक्का बसला आहे; पण मनातून संकटातून सुटल्यासारखेही वाटले असेल. ऑरेस्टीजने इजिस्थसला ठार मारल्यावर ती पुनः रंगमंचावर येते—त्रस्त, भयचकित अशी. मुलगा आपल्याला ठार मारायला उद्युक्त झाला आहे असे पाहून प्रथम ती त्याला शिव्याशाप देते, नंतर त्याच्या मातृप्रेमाला साद घालून पहाते—पण शेवटी त्याच्या तलवारीला बळी पडते.

निरोप पोचवायला निघालेली दासी, सोफोक्लीजच्या गौण पात्राप्रमाणे लक्षात रहाण्यासारखी आहे. इतर कोठेही इस्किलसने गौण पात्रे रंगवताना इतके कौशल्य दाखवलेले नाही. पण ही दासी भोळी, भाबडी, कुणी काय सांगेल तसे करणारी, घडलेल्या घटनांनी बावरलेली अशी छान रेखाटली आहे. गायिकावृंद "अर्घ्यधारिकांचा" आहे. या ॲगमेम्नॉनने ट्रायमधून लूट म्हणून आणलेल्या दासी आहेत. यामुळे त्यांना ॲगमेम्नॉनबद्दल जवळीक वाटते. ॲगमेम्नॉनच्या मुलांइतकेच त्यांना ॲगमेम्नॉनच्या मृत्यूचे दुःख झालेले आहे व क्लायस्टेम्नेस्ट्राचा राग आलेला आहे. त्याही सूड उगवण्याच्या इच्छेने उत्तेजित झालेल्या आहेत व राजाच्या मृतात्म्याला, त्याच्यावर झालेल्या अत्याचारांचा बदला घेण्यासाठी उत्तेजित करीत आहेत. देवतांचे त्या कामी साहाय्य मागत आहेत. मुलांच्या कटात साथ द्यायला त्या उत्सुक आहेत. क्लायटेम्नेस्ट्रा इजिस्थसला बोलवायला दासी पाठवते; तिला वाटेत गाठून, 'निःशस्त्र असा, रक्षकांना बरोबर न आणता ये' असा निरोप त्याला द्यायला त्या सांगतात. राजघराण्याच्या भाग्याशी त्या निगडित झाल्या आहेत. ऑरेस्टीजला पळ काढावा लागला, हे पाहून त्या व्यथित होतात.

वृंदगीते काव्यमय, जोरदार असून त्यात इस्किलसने आपले जीवनविषयक तत्त्वज्ञान ठिकठिकाणी गोवले आहे. क्लायटेम्नेस्ट्राच्या अपराधाबद्दल त्या म्हणतात,

"जो दुष्कर्म करील, त्याला त्याचा परिणाम भोगावाच लागेल."

"न्यायतत्त्व बदल्यासाठी आक्रोश करते व रक्ताबद्दल रक्ताचीच मागणी करते."

"न्याय्य पक्षाची ऐरण भूमीवर ठाम मांडते आणि नियती लोहाराप्रमाणे ठोकून, ठोकून हत्यार बनवते."

"अपराधाला शिक्षा झालीच पाहिजे."

या दंडकान्वये ॲपॉलो ऑरेस्टीजला मातृवध करण्याचा आदेश देतो. हिंसाचाराला हिंसाचारानेच उत्तर मिळते. या दुसऱ्या हिंसाचाराबद्दल दण्ड द्यायला क्रोधदेवता उद्युक्त होतात. या फ्युरीज ऑलिम्पिआनिवासी देवदेवतांच्या पूर्वीची दैवते होती. ती व्यक्तिगत असत व त्या त्या व्यक्तीच्या रक्तपातबद्दल संबंधित आप्ताचा सूड घेत. ऑरेस्टीज फ्युरिज्ना "माझ्या आईचे संतप्त, शिकारी कुत्रे" असे संबोधतो.

ऑरेस्टीआतले तिसरे नाटक "युमेनाइडीज्" म्हणजे दयादेवता. दुसऱ्या नाटकातल्या क्रोधदेवता अथीनीच्या समजावणीने शेवटी दयादेवता बनतात.

नाटकाच्या सुरवातीस ऑरेस्टीज व क्रोधदेवता डेल्फीच्या मंदिरात दिसतात. ॲपोलो ऑरेस्टीजला त्याच्या सदैव पाठीशी रहाण्याचे आश्वासन देतो; पण तरीही क्रोधदेवता त्याचा पिच्छा सोडणार नाहीत म्हणून त्याला अथेन्सजवळ पॅलस ॲथीनीकडे न्यायनिवाडा करण्यासाठी जाण्यास सांगतो. तो गेल्यावर क्लायटेम्नेस्ट्राचे पिशाच्च प्रगट होते व निद्रिस्त क्रोधदेवतांना ऑरेस्टीजचा पाठलाग करण्यासाठी चिथावते. मग सर्वच ॲक्रॉपॉलिसवरील







अॅथीनीच्या मंदिरात दाखल होतात. अॅथीनी उभय-पक्षांचे मुद्दे ऐकून घेऊन बारा प्रतिष्ठित अॅथीनीअन नागरिकांना पंच नेमते. त्याची मते समसमान पडतात, मग अथीनी ऑरेस्टीजच्या बाजूने मत देते व ऑरेस्टीज निर्दोष ठरून आपल्या राज्यात परत जातो. मग क्रोधदेवता आपल्या पराभवाने तळमळत, अथेन्सवर अरिष्टे आणण्याची भाषा बोलू लागतात; पण अथीनीने समजूत घातल्यावर त्या शांत होतात व अथेन्समध्ये पूजास्थान स्वीकारून नगरीच्या वरदायिनी देवता बनून राहतात. तेव्हापासून हे न्यायासन अॅक्रॉपॉलिसजवळच्या अॅरीज टेकडीवर कायम स्वरूपात प्रस्थापित झाले व अॅरीओपॅगस न्यायालय या नावाने, चोख न्याय देणारे म्हणून पिढयान् पिढया ओळखले जाऊ लागले.

कथानकात भाग्याची उलटापालट व सत्यस्थितीची प्रखर जाणीव आहे. आरंभीचा शरणार्थी म्हणून धावाधाव करणारा ऑरेस्टीज शेवटी निर्दोष ठरून राजपद भोगण्यास आर्‌गॉसला जातो. क्रोधदेवतांच्या अतिरेकी, असंयत सूडभावनेला आळा बसतो, नूतन देवायतनापुढे आपण निष्प्रभ आहो या जाणिवेने त्या वैफल्याने ग्रासून जातात. कथानकात वाचकांची उत्कंठा सारखी ताणली जाते. ऑरेस्टीज-बद्दल करुणा व सहानुभूती वाटते व शेवटी त्याच्या पदरी काय पडणार, याबद्दल पर्युत्सुकता वाढत रहाते, प्रत्यक्ष घटिते अत्यल्प, भाषणे, वादंगच पुष्कळ, तरीही इस्किलस आपल्या भाषाप्रभुत्वाने वाचकांचे अवधान प्रथमपासून शेवटपर्यंत खिळवून ठेवतो.

मानव-स्वभावदर्शनाला या नाटकात फारच थोडा वाव मिळतो. कारण एक ऑरेस्टीज सोडून बाकी सर्व देवदेवताच आहेत व त्यांची स्वभाव-वैशिष्टये नेहमी ठरलेलीच असतात. अॅपॉलो आपल्या भक्ताच्या सारखा पाठीशी रहातो. न्यायासनापुढे ऑरेस्टीजचे समर्थन करतो. अॅथनी आपल्या शहाणपणाबद्दल, समतोल बुद्धीबद्दल प्रख्यातच आहे. क्लायटेम्‌नेस्ट्राचे पिशाच्च जिवंत क्लायटेम्‌नेस्ट्रासारखेच मनस्वी, कोपिष्ट, दीर्घद्वेषी आहे. क्रोधदेवतांचा वृंद आहे- पण तो नाटकातल्या एका पात्राप्रमाणेच वावरतो व तो एक प्रमुख विरोधी शक्ती असल्यामुळे महत्त्वाचे स्थान घेतो. ही ऑलिम्पसनिवासी नूतन देवायतनापूर्वीची दैवतें. यांना 'एरिनीज' वा सूडदेवता असेही म्हणतात. मृतात्म्याचा शाप व प्रतिशोध घेण्याची प्रबळ इच्छा वास्तवात उतरवणाऱ्या या देवता – प्रत्येक मृतात्म्याची अशी एक सूडदेवता असते. या नाट-कातील क्रोधदेवता क्लायटेम्‌नेस्ट्राने मरताना ऑरे-स्टीजला दिलेली धमकी सत्यसृष्टीत उतरवण्यासाठी त्याचा पाठलाग करीत आहेत. या देवता आप्तरक्त-पाताच्या पापाचाच तेवढा पाठपुरावा करतात. अॅग-मेम्नॉनशी क्लायटेम्‌नेस्ट्राचा रक्तसंबंध नव्हता. म्हणून त्याच्या रक्तपाताचा सूड घेण्यास सूड-देवता उभ्या राहिल्या नाहीत. तो सूड अॅपॉलोला ऑरेस्टी-जकरवी घ्यावा लागला. दुसरा वृंद अथीनीअन नारींचा. हा फक्त शेवटी दयादेवतांना त्यांच्या पूजास्थानी नेण्यासाठी व झ्यूसला शेवटी सर्वांचा समेट घडवून आणला म्हणून धन्यवाद देण्यासाठी येतो व गात गात रंगमंचावरच्या, दयादेवता, पंच, व इतर पात्रे यांच्या प्रचंड मेळाव्यात सामील होतो.

दोन ठिकाणी घटिते योजण्याची इस्किलसची ही पहिलीच वेळ असावी. साधारणपणे ग्रीक नाट-कात स्थलांतर करण्यात येत नाही. पण इस्किलसला दृश्यांच्या साहाय्याने नाटकाची परिणामकारकता वाढविण्याची आवड होती. शेवटच्या दृश्याचा, मशाली घेऊन दयादेवतांना त्यांच्या भूगर्भातील सन्मान्य निवासस्थानाकडे गात गात नेत असलेला प्रचंड मेळावा– या भव्य दृश्याचा प्रेक्षकांवर किती परिणाम होत असेल, याची वाचकांनी कल्पना करावी.

"ऑरेस्टीआ" या त्रिपुटीत, प्रत्येक नाटकात कथानक वेगवेगळे असले, तरी मध्यवर्ती कल्पना एकच आहे. 'अपराधाला दण्ड झालाच पाहिजे.' पण त्या दण्डातूनच एक नवीन अपराध उद्भवतो व त्याचा पुन्हा दण्ड भोगावा लागतो-असे हे चक्र चालू रहाते. पण मग या दुष्टचक्रातून मानव बाहेर कसा निघेल ? त्याच्या वैफल्याला, निराशेला काही तोडगा आहे की नाही ? इस्किलस मानवाला देवा-धिदेव झ्यूसचा हवाला देतो. 'युमिनाइजमध्ये' अथीनी ही झ्यूसचीच प्रतिनिधी आहे. ती समजा-वणी (पर्सूएशन) च्या मदतीने क्रोधदेवतांचा अति-रेकी, आंधळा क्रोध शमवून अथेन्सला सुखशांती

प्राप्त करून देते. अॅपॉलोही झ्यूसचाच प्रतिनिधी. तो ऑरेस्टीजवरचा कलंक धुऊन टाकतो व अशा रीतीने या दुष्ट चक्राची समाप्ती होते.

झ्यूस कुठल्याच नाटकात रंगमंचावर येत नाही. कारण ग्रीक रंगभूमीचा तसा दंडक होता. पण झ्यूसची प्रतिमा इतर देवांच्या संभाषणांतून इस्किलसने आपल्या मनःचक्षूंपुढे साकार केली आहे. झ्यूस प्रथमदर्शनी जुलमी, मत्सरी, कोपिष्ठ, छळवादी वाटला, तरी अखेरीस मानवांचा तारणहार तोच आहे. तो स्वतः यातना सोसून शहाणपण शिकला आहे म्हणून मानवांबद्दल त्याला कणव आहे. तो स्वतः शरणार्थी आहे म्हणून शरणार्थ्यांचा तो त्राता आहे. मात्र मनोभावे मानवाने त्याला शरण गेले पाहिजे, त्याच्या संकेतांना मान देऊन वर्तले पाहिजे म्हणजे शेवटी तो सर्व काही ठीक करील.

या नाटकात झ्यूसचा–नवीन देवायतनाचा व क्रोधदेवतांचा, जुन्या देवतांचा संघर्ष आहे. ही जुनी दैवते फक्त कायदा जाणतात– त्यांना विवेक, दया, माया नाही. पण नवीन देव विवेकी, प्रज्ञावंत आहेत. अॅरिस्टॉटलने कायदा ( लॉ ) व विवेक ( इक्विटी ) यांमध्ये विवेक श्रेष्ठ मानला आहे. अथीनी पंचांना उद्देशून जे भाषण करते, ते तत्कालीन ग्रीक प्रेक्षकांनाही मार्गदर्शक वाटले असेल. त्या भाषणात ती दरारा व क्षमाशीलता यांचा यथायोग्य मिलाफ न्यायदानात नित्य व्हावा, असे प्रतिपादन करते:- झ्यूसला शरण आलेल्याला तो यातनांतूनच तावून सुलाखून बाहेर पडला असल्यामुळे, झ्यूस दया दाखवतो. अशीच दया त्याने आयोवर, प्रॉमिथिअसवर केली व अशाच दयाक्षमाशीलतेने तो ऑरेस्टीजला दोषमुक्त करतो.

जुन्या व नव्या देवतांच्या संघर्षानंतर त्यांचा शेवटी मिलाफ होतो. जुन्यांनी आपला हटवादीपणा सोडल्यानंतर त्यांना नव्या देवायतनात समाविष्ट करून घेण्यात येते. जुन्या देवता या अविवेकी अंतःप्रवृत्तींच्या प्रतीक आहेत, नवे देव या अंतःप्रवृत्तींना निर्दाळून न टाकता, समजावणीने त्यांचा हृदयपालट करून त्यांना पूजनीय, स्वीकारणीय बनवून सोडतात. ते विवेकाचे प्रतीक आहेत. हा सर्वच कथाभाग मानववंशाच्या प्रगतीच्या इतिहासाचे प्रतीक आहे. मानवाच्या सहज–प्रेरणा या हिंस्र, सारासार विचार न करणाऱ्या, विनाशक असतात. पण त्यांचा समूळ विनाश करणे इष्ट नसते. त्यांचे विवेकाच्या साहाय्याने उन्नयन करून, मानवाच्या प्रगतीला त्यांच्या शक्ती जुंपल्या पाहिजेत.

अशी ही इस्किलसची श्रेष्ठ नाटके, त्यातील प्रगाढ तत्त्वचिंतनाने, भव्य प्रतिभाशक्तीने, भाषावैभवाने व परिणामकारक दृश्यांनी विश्व-साहित्यात मानाचे स्थान मिळवून अमर झाली आहेत.

---

## चुकीची दुरुस्ती

'नवभारत' जुलै, १९७९ च्या अंकात पृ. ३८, स्तंभ २ रा वरून ९ वी ओळ : "पण प्रकाश ऊर्जा हवेच्या पुंजात समाविष्ट झालेली असेल ......" या ऐवजी "पण प्रकाश ऊर्जा छोट्या पुंजांत समाविष्ट झालेली असेल ......" असे वाचावे. — का. सं.

अनिरुद्ध कुलकर्णी

# यंत्रयुगातील सिद्धहस्त

---

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस पश्चिमी वास्तुविद्या अर्धमृत अवस्थेस येऊन पोहोचली होती. पूर्वेकडील वास्तू तर मध्ययुगातच नांदत होत्या. पुण्यात, फर्ग्युसन कॉलेज, विद्यापीठ, जुने ससून हॉस्पिटल यांच्या इमारती जशा आहेत किंवा मुंबईला व्ही. टी. स्टेशन, राजाबाई टॉवर किंवा हायकोर्ट यांच्या इमारती जशा आहेत तशा प्रकारच्या लहानमोठ्या इमारती उठविण्यात पाश्चात्त्य वास्तुविद् मशगूल होते. जाड दगडी भिंती, तिरकी उंच कौलारू छपरं, उंचाडद्या खिडक्या, अवजड दरवाजे, बेढब जिने, भिंतींना फासलेले पिवडीचे रंग, अंधाऱ्या खोल्या, जाड फरशा ही या इमारतींची वैशिष्टचे होती. सभोवताली निर्माण होत असलेल्या नव्या युगाशी त्यांचे नातेच उरले नव्हते.

या प्रबोधनकालात जन्मलेल्या व नंतर वाढलेल्या इमारतींचा सरंजामी असा थाट होता, नाही असे नाही. पण तो काहीच इमारतीत प्रत्ययास येई. अशा इमारती बांधणे खर्चिक होत होते. खर्च कसा वाढेल ह्याचीच काळजी त्यावेळचे स्थापत्यशास्त्री घेत होते. चाकोरी सोडून तर कोणी विचारच करायला तयार नव्हते. ब्रिटिश वा फ्रेंच राज जेथे जेथे पोहोचले तेथे तेथे या इमारती पोहोचल्या. गल्ल्याबोळांनी भरलेल्या गिचमिड शहरांशेजारी जाऊन उभ्या राहिल्या. जनसामान्यांच्या घरांचा तर कोणी विचारच करत नव्हते. गवंडी–मिस्त्री बांधतील ती घरे आणि करतील ती पूर्व दिशा. अशा घरांतून आणि जुनाट गावांतून राहाणे खरे म्हणजे आनंददायक नव्हते. माणसं आनंदी होती ती स्वास्थ्यामुळं आणि स्वस्ताईमुळं. राहणीमानाच्या कल्पनाच खुरट्या असल्यामुळे.

पहिल्या महायुद्धानंतर आणि विशेषतः १९२९ ते १९३४च्या काळात या वाडयांनी केलेली आणि या घरांची झालेली कोंडी फुटली. नव्या घरांचा आणि नव्या शहरांचा विचार सुरू झाला. आधुनिक वास्तू आणि वास्तुविद्या युरोपात जन्मास आली. सिमेंटकाँक्रीट, पोलाद आणि काचा ही याला कारणीभूत ठरली. शहरातील नव्या भागांना नवे तोंडावळे प्राप्त झाले. अमेरिकेत तर गगनचुंबी इमारतींची स्पर्धा गगनाला भिडली. जर्मनीत रस्त्यांची बांधणी बदलली. १९६५ साली जेव्हां ल कॉर्बुझिए वारला तेव्हांतर आधुनिक वास्तुकला व वास्तू एक नवे वास्तव म्हणूनच उभे राहिले. यंत्रयुगाला पुरून उरणारे एक वास्तव, म्हणून.

वाल्टेर ग्रोपिऊस, कॉर्बुझिए, मिझ् व्हॅन डेर रो, राईट, मायर अशांसारख्या मूठभर क्रांतिकारक वास्तुकलावंतांनी हा कायापालट घडवून आणला. अर्थात् यांत मुख्य ' हीरो ' कॉर्बुझिए. हा स्विस–फ्रेंच वास्तुकलावंतच होता. याचे कारण इतर स्थापत्यशास्त्रज्ञ किंवा वास्तुकलावंत जे करीत नसत ते त्याने केले. प्रत्येक बाबतीत क्रांतिकारक नावीन्य आविष्कृत करणाऱ्या इमारती त्याने बांधल्या आणि त्याच जोडीला त्याचे मूलभूत विचार अनेक पुस्तके लिहून लोकांसमोर मांडले. त्यांचा अत्यंत मिशनरी वृत्तीने आणि हिरीरीने प्रचार केला. वास्तुशास्त्र, वास्तुतील अवकाशाचे नियोजन, नगररचना, फर्निचर मानवी जीवन या सर्वांवर अगदी तपशीलाने विचार मांडले. तो वास्तुशास्त्राचा–वास्तुकलेचा तत्त्वज्ञ बनला, खऱ्या अर्थाने ' मास्टर बिल्डर ' बनला. रूटीन ठोकळेबाज पद्धतीने जे इमारती बांधीत होते त्यांच्यावर त्याने टीकास्त्र सोडले.

अनुक्रमणिका

यामुळे वास्तुकला वादग्रस्त बनली तरी घरबांधणीचा आणि पर्यायाने नगर रचनेचा नवीन दृष्टिकोणातून विचार व्हावयास पाहिजे हे अनेक जाणत्यांना पटले. नवीन वास्तूंचे स्वागत करणारे अनेकजण सामान्य माणसातही निर्माण झाले.

या क्रांतिकारक मोहिमेविषयी सिंहावलोकन करताना ल कॉर्बुझिए म्हणतो, " १९२७ पर्यंत मी आणि माझा भाऊ पिएर जानेरे असे दोघेजणच या मोहिमेत होतो. त्यानंतर उत्साही आणि निष्ठावंत तरुणांच्या अखंड ओघामुळे आमचे वर्तुळ हळूहळू वाढू लागले. जगाच्या कानाकोपऱ्यातून, तरुण पिढीतील वास्तुविद् आमच्या मठीत गोळा झाले. त्यांच्याजवळ आत्मविश्वास आणि शिकण्याची इच्छा होती. त्यांचा कामाचा उरक तर इतका दांडगा होता, की आळस वा कंटाळा यांना वावच नव्हता. त्यांच्या उत्कट सत्यप्रीतीचे आणि सखोल श्रद्धेचे आम्ही ऋणी आहोत " ( कंप्लिट आर्किटेक्चरल वर्क्स, खंड २ ).

दोन महायुद्धांच्या दरम्यान अनेक 'प्रेषित' उदयाला आले. मुसोलिनी, शास्त्रज्ञ चेंबरलेन, हिटलर, शॉ, ट्रॉटस्की, इ. अनेक; परंतु लवकरच ते निस्तेज झाले. दुसऱ्या महायुद्धानंतर तर त्यांची नावापुरतीच निशाणी उरली. कॉर्बुझिएचे मात्र असे झाले नाही. टी. एस्. एलियट, पिकासो, आईनस्टाईन यांच्याप्रमाणे त्याचा प्रभाव आणि महत्त्व आजही पूर्वीच्याच उत्कटतेने शाबूत आहे, किंबहुना ते वाढतच आहे.

१९१९ साली वाल्टेर ग्रोपिऊसने जर्मनीत वायमार येथे 'बाऊहाऊस' ही नव्या वास्तुविद्येची चळवळ उभारली. डेसॉ येथे या चळवळीचे 'बाऊहाऊस'ही आदर्श म्हणून बांधले. आधुनिक 'आंतरराष्ट्रीय' वास्तुकलेचा हा पहिला वास्तुपाठ होता. (ही इमारत पुढे युद्धात नात्सींनी नष्ट केली. ) ज्या उद्दिष्टांकरिता इमारत बांधली जाते ती उद्दिष्टे पूर्णपणे तडीस गेली पाहिजेत. आकारिक सौंदर्य काय ते आपोआपच निर्माण होते हा कार्यवाद ग्रोपिऊसने कठोरपणे राबविला. वास्तुकलेतील नक्षीकाम, जाळीकाम, अवास्तव मापाच्या दारे–खिडक्या, निष्कारण जाड भिंती या साऱ्या साऱ्यांना त्याने सिमेंट, पोलाद, काचा ही नवी सामग्री वापरून पूर्ण फाटा दिला. इमारतींबरोबरच भांडी, कड्या–कोयंडे, पलंग, कपाटे, वस्तरा इ. गोष्टींचाही त्याने विचार केला. परिणामी एकोणीसाव्या शतकातील युरोपीय, ऐसपैस, पायघोळ वास्तुकला त्याच्या दणक्यामुळे पेंढा भरलेल्या वाघासारखी कोसळली. "Form follows function" हा नवा मंत्र हा हा म्हणता युगमंत्र ठरला.

मिझ् व्हॅन डेर रो आणि ल कॉर्बुझिए दोघेही सुरुवातीस या कार्यवादाची री ओढून पुढे आले... less is more म्हणणाऱ्या मिझ्ने कार्यवाद आणि अभिजात सौंदर्यकल्पना यांची सांगड घातली. त्याच्या 'स्कायस्क्रॅपर्स'मुळे तो गाजला. पण कॉर्बुझिएने ग्रोपिऊस आणि मिझ् या दोघांवरही कडी केली. 'हाऊस इज ए मशीन टु लिव्ह इन्' या मिझ्च्या घोषणेला त्याने यंत्रयुगातील घरे कशी हवीत याचे सिद्धान्त मांडून प्रत्यक्षात आणले. कार्यवाद आणि आधुनिक तंत्रविज्ञान यांची सांगड त्यानेच सुरुवातीच्या कालखंडात घातली. त्याच्या "ल मोद्युलो" च्या सिद्धान्तामुळे तर आधुनिक वास्तुकला म्हणजे कॉर्बुझिए आणि कॉर्बुझिए म्हणजे आधुनिक वास्तुकला हे समीकरण इतिहासात कायम झाले. ग्रोपिऊसचे 'बाऊहाऊस', मिझ्चे 'टच्यूगनहाट हाऊस' यांच्यावर मात करणारे 'विला साव्वॉय्य' त्याने बांधून दाखविले. या तीन इमारती आज आधुनिक वास्तुकलेचा पहिला आदर्शपाठ म्हणून ओळखल्या जातात. क्लॅरिटी, प्युरिटी, युनिटी -निर्दोषता, विशुद्धता आणि एकात्मता यांचा आदर्श.

कॉर्बुझिएने बांधलेल्या श्रेष्ठ इमारती तर आज देशोदेशी आहेत. त्यांचे वर्णन करणे शब्दांनी जमणारे नाही प्रत्यक्ष नाही तरी छायाचित्रांच्यामार्फत जरी त्यांचा परिचय करून घेतला, तरी या महामानवाने काय किमया केली आहे हे समजण्यासारखे आहे. ला मेझाँ रोश, विला साव्वॉय्य, सित्रोहान हाऊस, सेंत्रोसोयूस (मॉस्को) विला श्वोब, मेझाँ ला तुरेन ( लिआँ ), पॅरीस विद्यापीठातील पाविलिओं सुईस, मार्सेय्य येथील ल्युविते दाबितासिओ, रोशां येथील नोत्र दाम द्यु ओत हे चर्च, एस्प्रि नू व्हो या नवकलादालनाची इमारत, ओझनफां या

अनुक्रमणिका

सहकारी चित्रकाराचे घर, राम्बुईले येथील विश्रांती-निवास, मेझाँ लिप्‌चिटस्झ्‌ मिस्टशानिनोफ, पेसाक येथील घरांची वसाहत, पॅरिसमधील पॅले द्यु प्युप्लअ, विला मांद्रो, पॅरिस येथील निर्वासित–निवास, मेझाँ जाऊल, आयडिअल होम (लंडन), अल्जिअर्स येथील मरीन क्वार्टर्स, चंडीगढ येथील सेक्रेटारिएट, हाय-कोर्ट, विधानसभा, गवर्नर पॅलेस, या इमारतींचा समूह, नांत रेझे येथील वसाहतींच्या इमारती, अहमदाबाद येथील मनोरमा साराभाई निवास, विला शोधन, व कापड–गिरणी मालकांच्या संघटनेचे केंद्र, टोकियो येथील राष्ट्रीय आर्ट म्युझिअम, ब्रुसेल्समधील फिलिप्स पॅविलिअन, पॅरिस–ओर्से येथील सांस्कृतिक केंद्र, ब्राझीलमधील फ्रेंच एम्बसीची इमारत, स्ट्रासबुर्गमधील पॅले देस काँग्रेस अशा अनेक इमारती कॉर्बुझिए हे नाव उच्चारताच त्याच्या चाहात्यांच्या डोळ्यासमोर तरळू लागतात. यातील जवळजवळ सर्व इमारतींची प्रेक्षणीय स्थळांत गणना होते. हजारो प्रवासी, वास्तुकला–स्थापत्य शास्त्राचे विद्यार्थी दरसाल त्यांना भेटी देतात. कॉर्बुझिएने उभारलेले त्याच्या 'विल रादियूझची'– आदर्शनगरीची कल्पना साकारणारे, चंडीगढ तर आधुनिक वास्तुशास्त्रज्ञ, कलावंतांची व आधुनिकतेची चाहा करणाऱ्या प्रवाशांची मक्काच झाले आहे.

या जबरदस्त युगनिर्मात्याला समजावून घेणे सोपे नाही. वीस–वीस पंचवीस–पंचवीस वर्षे ज्यांना त्यांचा सहवास व स्नेह लाभला अशा तज्ज्ञांनादेखील त्याचे नवीन नवीन पैलू दृष्टीस पडत राहातात. चित्रकार, शिल्पकार, वास्तुकलावंत, नगररचनाकार, आधुनिकतेचा प्रवक्ता, जीवनाचा भाष्यकार अशी अनेक अंगे असणारे हे लोकोत्तर व्यक्तिमत्त्व होते. 'In order to understand him one has to discover him.' हे पॅरिसच्या कार्बुझिए फौंडेशनचे संचालक आन्द्रे वोगेन्स्की यांचे उद्गार अक्षरशः खरे आहेत.

विसंगतींना भिणारी माणसे जीवन समजावून घेण्यास असमर्थ ठरतात. ती कॉर्बुलाही समजू शकणार नाहीत, कारण विसंगतींना सामावून घेण्याइतपत त्याचे व्यक्तिमत्त्व आणि कार्य समृद्ध व विशाल आहे. त्याच्या कार्याचा, पुस्तकांचा व योजनांचा जसजसा वाढता परिचय होतो तसतशी या सर्वांतील आंतरिक एकात्मता लक्षात येते. कॉर्बुझिए विसंगतींना कवटाळतो, ढोबळ वर्गीकरणांचा निषेध करतो, तथाकथित समस्या धुडकावून लावतो, विरोध निस्तेज करतो आणि एका समग्रतेवर, आंतर्बंध सम्यकावर त्याचे भरारते विचार उभारतो, वास्तुशिल्पे बांधतो.

त्याला युटोपिअन म्हणणे, स्वप्नाळू म्हणून कमी लेखणे वाजवी नाही. युटोपिअन विचारवंतात (उदा. रूसो, सां सिमाँ) नवा शोध महत्त्वाचा आणि कला दुय्यम असे दिसते. कॉर्बुझिएमध्ये असे नाही. युटोपिआपेक्षा आदर्शाकडे त्याच्या मनाची ओढ आहे. निर्दोष रचना कशी साधायची याच्याकडे त्याचे सारे लक्ष असे. पॅरिस युनिव्हर्सिटीतील 'स्विस पॅविलिअन' मध्ये त्याने एकेका इंचाचा विचार केला आहे. सर्वप्रथम तो वास्तववादी होता; पण त्याची सर्जकता इतकी प्रखर होती, की तो वास्तवाला आदर्शाप्रत खेचून नेई. 'युनिते दाबितासिओ' काय किंवा रॅडिअन्ट सिटीच्या त्याच्या योजना काय माणसे, कुटुंबे, समाज प्रत्यक्षात, वास्तवात कसे आहेत याचा विचार करूनच निर्माण केल्या गेल्या आहेत. त्याची बांधकामे, त्याचा शहरवाद हे समाजरचनेचे त्याला जे दर्शन झाले त्यावर आधारली आहेत.

उंच उंच, 'ब्लॉक्स' असलेल्या इमारती आणि मुंबईसारख्या घाणेरड्या शहरातील गचाळ, गळक्या चाळी कॉर्बुझिएमुळे निर्माण झाल्या असे जे मानतात त्यांना कॉर्ब समजलाच नाही. कारण या इमारती कॉर्बुझिएच्या इमारतींच्या बाह्यांगांचे केविलवाणे अनुकरण केल्याने निर्माण झाल्या आहेत. या इमारतींत त्याचे 'तत्त्वज्ञान' नाही आणि त्याची गगनस्पर्शी प्रतिभा तर सुतराम् नाही. अशा एकावर एक रचलेल्या बेंगरूळ 'फ्लॅट्स' मध्ये गुंफण कोठे असते? एकात्मता असते का? अशा फ्लॅटसमुळे समाजाचे 'संघटन' होते का?

कॉर्बुझिए कार्यवादी होता तर फ्रँक लॉइड राईटची वास्तुकला जैविक आहे हा मोठा गैरसमज आहे. तर्क आणि बुद्धी यांच्या पलीकडे वास्तूंच्या आतील अवकाशाच्या गुणवत्तेने गेले पाहिजे, कार्यवाद ओलांडला पाहिजे असे तो सांगे. कार्यवाद हा शब्दसुद्धा त्याला आवडत नसे. बांधकाम कोणतेही असो ते प्रातिभ असलेच पाहिजे यावर त्याचा कटाक्ष

अनुक्रमणिका

असे. Making architecture is making a creature हा त्याचा उद्‌गार त्याची यंत्रयुगीन आणि आधुनिक वास्तुकला व वास्तू समजावून घेण्याला खरोखर मार्गदर्शक ठरतो. कॉर्बुझिए पिकासोबरोबरीचा आणि 'सेझान'ला मानणारा चित्रकार होता हेही आपण विसरता कामा नये.

खडबडीत सिमेंटच्या भिंती, घरांची सपाट छपरे, सपाट गच्च्यांवरील बागा, जोतं नसलेल्या, एक मजला वर उचललेल्या इमारती, काचांच्या दर्शनी भिंती, पोलादी चौकटीत बसविलेली मोठमोठी काचांची तावदाने, सनब्रेकर्स, आवारात फरशां-ऐवजी घातलेले सिमेंटचे पाटे आणि त्यामधून डोकाविणारी लुसलुशीत हिरवळ, नुसत्या पाईप्सचे कठडे असणारे जिने, अशा अनेक आधुनिक तत्त्वा–तंत्रांची मुळे शोधू गेले तर कॉर्बुझिएमध्ये ती सापड-तात. पण या तंत्रात आधुनिक वास्तुकलेचे मर्म आहे काय? नाही. किंबहुना ह्या कलृप्त्या आहेत. मर्म आहे ते त्यांच्यामागे जो मूलभूत विचार कॉर्बुझिए मांडीत होता त्यात आहे.

**व्हेर्स यून आर्शितेक्त्यूर** या १९२३ साली प्रकाशित केलेल्या क्रांतिकारक ग्रंथात कॉर्बुझिएने त्याची भूमिका नेटकेपणाने मांडली आहे.

यंत्राधिष्ठित कारखानदारीने आणि उद्योगधंद्यांनी आपणाला वेढून टाकले आहे. तिच्या पुरात जणू आपण सारेजण वाहातो आहोत आणि एका अज्ञात दिशेकडे ढकलले जातो आहोत. असे असले तरी या कारखानदारीनेच नव्या युगाच्या बांधकामासाठी लागणारी सामग्री आपणास पुरविली आहे. यंत्रांचा उपयोग करून आपण घरांची निर्मिती मास–प्रॉड-क्शनच्या धर्तीने केली पाहिजे. भिंती, छपरे, खिडक्या दारे ही कारखान्यात तयार झाली पाहिजेत. जागेवर आणून ती नुसती जुळविता आली पाहिजेत. सामान्य-जनांच्याच नव्हे तर मध्यमवर्गीयांच्या घरांचादेखील प्रश्न या घाऊक घर–निर्मितीतून सोडविला पाहिजे. मास प्रॉडक्शन तंत्रांनी तयार केलेल्या घरांतून राहा-ण्याचा निर्धार आधुनिक कामगारांनी, माणसांनी केला पाहिजे.

घर बांधणीसंबंधीच्या जुन्या मृत कल्पना जर मनातून काढून टाकल्या, दोमिनो तंत्र जर स्वीकारले, ('दोमिनो' ही दुमजली चौकटीच्या खांबात बांधलेल्या घराची कल्पना) चिकित्सक, वस्तुनिष्ठ दृष्टीने जर पाहू लागलो तर आपण वास्तू-यंत्र 'House machine' या कल्पनेपाशी येतो. यंत्रे जशी धट्टीकट्टी व १००% कार्यक्षम असतात तशीच घरे हवीत. ती सुंदर दिसतीलच. त्याची स्वतंत्र फिकीर नको. आधुनिक माणसाजवळ यंत्र-बुद्धी-मेकॅनिकल सेन्स– हवीच. यंत्राविषयीची आत्मीयता दैनंदिन घडामोडींमुळे योग्य असल्याचे सिद्ध होते. यंत्र–बुद्धीमुळे यंत्राविषयी (आणि यांत्रिक घरांविषयी) आदर व कृतज्ञता वाटते.

वास्तुकला ही चैतन्याची विशुद्ध निर्मिती आहे. रूप आणि आकारांची सुंदर रचना करून इंजिनि-अरला सुसंगती साध्य करण्यात मदत करणे हे आर्किटेक्टचे काम आहे. घनफळ (mass), पृष्ठ-भाग (surface) व आराखडा (plan) ही त्रिसूत्री त्यांनी सतत डोळ्यासमोर ठेवली पाहिजे.

घर बांधणीची समस्या सर्व सामाजिक असंतो-षाच्या मुळाशी आहे. घर बांधणीचा आणि पर्या-याने नगररचनेचा प्रश्न जर आपण यशस्वीरीत्या सोडवू शकलो तर रक्तरंजित क्रांती आपण टाळू शकू. क्रांतीपेक्षा घरबांधणीचा मार्ग आपण स्वीका-रला पाहिजे. हा या क्रांतिकारक ग्रंथाचा थोड-क्यात आशय आहे. घाऊक घरांच्या अनेक प्रतिकृती कॉर्बुझिएने येथे प्रसृत केल्या आहेत.

मौज अशी की दुसऱ्या महायुद्धाच्या आसपासच या विचारांविरुद्ध प्रतिकूल प्रतिक्रिया सुरू झाली. वास्तुकला निसर्गाकडे नेण्याचा प्रयत्न झाला. या प्रक्रियेतही कॉर्बुझिनेच सिंहाचा वाटा उचलला. आणि असे असले तरी हा ग्रंथ कालबाह्य झालेला वाटत नाही. याचे कारण यंत्रावर जरी आज कोणाचा फाजील विश्वास उरलेला नसला, तरी मास हाऊ-सिंगची, मोठ्या प्रमाणावरच्या घरबांधणीची समस्या आजही शिल्लक आहे. संपूर्ण समाजाच्या घरबांधणीचा प्रश्न सोडविला तरच सुखासमाधानाने नांदता येणे शक्य होणार आहे, हे सत्य शिल्लक उरले आहे.

कॉर्बुझिएच्या परिपक्व विचारांचे दर्शन वीस वर्षांच्या अखंड संशोधनानंतर त्याने जे दोन महान्

ग्रंथ लिहिले त्या Sur les 4 Routes (१९४१) आणि Les trois Etablissements Humains (१९४४) ग्रंथांत दृष्टीस पडते.

वास्तुशास्त्राच्या, वास्तुकलेच्या क्षेत्रात क्रांती झालेली आहे हे चोवीस मूलभूत मुद्द्यांच्या विश्लेषणातून तो दाखवितो. ते मुद्दे असे : (१) पारंपरिक घरबांधणी. लाकूड, दगड, विटा. पायाची खोदणी आणि तळघरे. (२) पायाच्या भिंतीची श्रेणी. प्रत्येक मजल्यावर सारखी. (३) या तत्त्वावर उभारल्या गेलेल्या सहा मजली इमारती. परंतु (४) घराचे तोंड मात्र गडबड, गोंधळ, धोका, धूळ यांना सामोरे जाणारे. घराचा मागचा भाग उघड्या माळरानाकडे पाहणारा (५) माळरानही मागे वस्ती वाढल्याने निकालात निघाल्यावर (६) परिणाम 'ब्लॉक'. कोंडी. चहुबाजूला रस्ते. परिणामतः शहर म्हणजे दगड धोंडे, खडी, गोंगाट, कंटाळवाणेपणा यांचे वाळवंट. नैसर्गिक स्थितीचा विलोप. माणसाचे शरीर आणि मन या दोहोंचा कोंडमारा.

१९ व्या आणि २० व्या शतकांत क्रांतीस सुरुवात. पोलाद, कांचा आणि रिएनफोर्सड सिमेंट हे तीन कारणीभूत घटक. वास्तुशास्त्रीय क्रांती. (७) भारवाहक भिंतीच्या पायाऐवजी खांबांचा पाया. प्रत्येक खांबाखाली पुरेसा पाया, संपूर्ण जमीन मोकळी. पहिला मजला ३ ते ५ मीटर्स उंचीवर. घरांखाली मोकळी जागा (८) घरांखालून विनाअडथळा वाहातूक. (९) जवळ जवळ १००% जमीन पादचाऱ्यांच्या हालचालीस मोकळी (१०) मोटारी आणि पादचारी हे वेगवेगळ्या पातळ्यांवर, त्यामुळे एकमेकांपासून विभक्त व सुरक्षित. (११-१२-१३) रस्त्यावरून जाणारे किंवा रस्त्याखालून जाणारे रस्ते- व्हियाडक्टस् आणि सबवेज. (१४) गच्चीचा माळा सपाट व त्यावर अर्धवर्तुळाकार छत्रीवजा स्लॅब्जची आच्छादने. त्यामुळे पावसाचे पाणी आतल्या बाजूस ओघळणार. (१५) गच्चीवर बाग त्यामुळे उष्णतेच्या किंवा थंडीच्या परिणामांपासून सुरक्षितता. (१६) घरांचा दर्शनी भाग काचांचा. वाटल्यास १००% काचांचा. घरबांधणीतील क्रांती ती हीच. हवेत उंच घरे बांधल्याने परिसराचा मोकळा वापर. (१७) C I A M या संस्थेचा अथेन्स चार्टर. तेव्हापासून नगररचनेची सामग्री म्हणजे (१८) सूर्य (१९) स्थल (२०) वनश्री, पोलाद आणि कॉंक्रीट. याच क्रमाने आणि क्रमशः महत्त्वाची.

वास्तुशास्त्रीय क्रांतीमुळे नैसर्गिक जगण्याची शक्यता पुन्हा निर्माण झाली आहे. जुनी दारुण अवस्था नष्ट होणार आहे. वास्तूंचे नवे जीवशास्त्र उदयाला आले आहे. आतून बाहेर वाढ हे या जीवशास्त्राचे मूळ सूत्र. (२१) Y-वाय्-आकाराच्या जमीन कापणाऱ्या इमारती (२२) spinal आकार (२३) आणि frontal आकार (२४) असे द्विविध (in redans). इमारतींभोवती मोकळी हवा, सूर्यप्रकाश आणि निसर्गरम्य वनश्री. ही इमारतीच्या बांधणीतील क्रांती घडून आल्यामुळेच आधुनिक नगररचना शक्य.

आधुनिक शहररचनेत अंतर्भूत आहे, चार मार्गांची क्रांती. ती अशी : (१) रस्ते : मोटारींमुळे जमिनीवरील रस्ते नव्या तऱ्हेने बांधावे लागत आहेत आणि या मोटार-रस्त्यांमुळे देशांतील अंतर्भागांचा व तेथील माणसांचा समतोल बिघडतो आहे. त्याचे कपडे आणि सवयी बदलत आहेत. हमरस्ते ज्ञानप्रसाराचे, माहिती-वितरणाचे माध्यम झाले आहेत. या ज्ञानप्रसाराचा वेग इतका आहे, की अगदी देशांतर्गत भागातील लोकदेखील आधुनिकतेशी जोडले जात आहेत. नव्या रस्त्यांमुळे फॅक्टरी कामगार, शहरी कामगार आणि शेतकरी कामगार यांच्यातील सुप्त शक्तीच्या ऐक्याची शक्यता निर्माण झाली आहे. मात्र दोघांच्या कामातील मूलभूत फरक आहेच. शिवाय शेतकऱ्याचे जीवन पूर्वीप्रमाणेच ऋतुमानाचे- ३६५ दिवस, ४ ऋतू, २४ तासांचे- आहे तर शहरी कामगाराचे जीवन फक्त २४ तासांचे आहे. ऋतू कोणताही असो, त्याच्या जीवनक्रमात तसा फरक नाही. (२) रेल्वे रस्ते : रेल्वेमुळे रेल्वे संस्कृती. पण ही फारकाळ टिकणार असे दिसत नाही. पहिले यंत्रयुग (१९ वे शतक) घृणास्पद औद्योगिक शहरांचे होते. ही शहरे धूर व गडबड यांनी व्यापलेली. मानवी मूल्यांची व नियमांची पर्वाच या युगाला नव्हती. त्यातून माणसांचे शोषण व क्रांती जन्मली. मोठे हमरस्ते आणि रेल्वे रस्ते जेथे एकत्र येतात तेथे १९ व्या शतकातील औद्योगिक शहरे वसली व सुजली.

दुर्दैवाने मनुष्यबळ, घरे आणि अन्न यांच्या उपलब्धी-मुळे उद्योगधंदेही याच शहरांत निर्माण होऊन त्यांची रेडिओसेंट्रिक शहरे झाली. पण त्यामुळे मुख्य शहर व उपनगरे दोन्ही गुदमरून जातात. उदा. मॉस्को, शिकागो, मुंबई. (३) जलरस्ते : पाण्याच्या मार्गाने होणारी वाहातूक काही ठिकाणी बंद पडली असली तरी जिवंत ठेवावयास हवीच. राईन नदीचे उदाहरण महत्त्वाचे. (४) हवाई मार्ग : दोन युद्धांमुळे विमानांची क्रांतिकारक निर्मिती झाली, आणि आज तर विमान वाहातूक आणि हवाई अड्डे आधुनिक जीवनाचा अविभाज्य भाग बनले आहेत. अत्यंत प्रगत आणि कार्यक्षम यंत्रणा, रडारसारखी यंत्रे यातून उदयाला आली आहेत.

चार मार्ग आणि वास्तुशास्त्रीय क्रांती यांचा समन्वय कॉर्बुझिए तीन मानवी वस्त्यांची कल्पना मांडून करतो. त्याच्या मते **शेती-केंद्रित वस्ती** ही पहिली मानवी वस्ती. तिचे स्थान प्रदेशांतर्गत भाग. किंवा आडबाजूची किनारपट्टी. जमिनीची मशागत करून धान्य व भाजीपाला आणि दूधदुभते उत्पन्न करणे हे शेतीवाडीचे ( farming unit ) मूलभूत कार्य. अशा वस्त्यांना छोटी कारखानदारी, लघु उद्योग, शाळा, शेतकऱ्यांचे क्लब्स्, देवळे यांची जोड हवी. दुसरी वस्ती म्हणजे **क्षैतिजिक औद्योगिक नगर** ( Linear Industrial-town ). पहिले तीन मार्ग एकत्रित येतात तेथे निर्माण होणारी ही मानवी वस्ती. फॅक्टरीज आणि मिल्स यांनी अशा वस्त्या गजबजतात. पण नीट रचना व बांधणी केल्यास अशा वस्त्यांचे उद्यान नगऱ्यांत ( garden cities ) मध्ये रूपांतर करता येते. उदा. हांबुर्ग. येथे मैदाने व घराला लागून बागा हव्यात. दिवसाच्या शाळा, युवक केंद्रे, बालवाड्या, सिनेमा नाटक थिएटर्स, छोटी वाचनालये, ट्रेनिंग सेंटर्स, तंत्रवैज्ञानिक महाविद्यालये, संशोधन केंद्रे, क्रीडांगणे, रेसकोर्स, हॉटेल्स, इत्यादींनी ही शहरे समृद्ध हवीत. ही शहरे मर्यादित वाढीची ठेवून सुधारत व नव्याने उभारत नेली तर सुख, स्वास्थ्य देतील. मात्र जर का ती ( मुंबई सारखी ) अनिबंध वाढत गेली तर त्यांचा नरक होण्यास वेळ लागणार नाही. मग बकाली, रोगराई, झोपडपट्ट्या, व्यसने, गुन्हेगारी ओघाने आलेच. मानवाची तिसरी वस्ती म्हणजे **रेडिओसेंट्रिक शहरे**. ही शहरे प्रामुख्याने प्रशासकीय, व्यावसायिक आणि कलात्मक चलनवलनाची केंद्रे असतात. उदा. बॉन, वॉशिंग्टन, चंडीगढ इ. मोठे राष्ट्रीय मार्ग, रेल्वेरस्ते, हवाई अड्डे, घरबांधणी-साठी मोठे परिसर, सार्वजनिक व खाजगी प्रशासनाची कार्यालये, चर्चं, थिएटर्स, हॉटेल्स, ग्रंथालये, सांस्कृतिक केंद्रे, वस्तुसंग्रहालये यांची वाढ अशा प्रकारच्या वस्त्यांच्या जीवनाचा विकास करते.

कॉर्बुझिएच्या मते या तीन मूलतः भिन्न पिंडांच्या वस्त्यांची गल्लत कधीही होता कामा नये. ती झाली की अराजकाला सुरुवात होते. याचे कारण या तीन वस्त्यांची मूलभूत उद्दिष्टेच भिन्न आहेत. यंत्रयुगातील संस्कृतीला या तिघांचाही आधार हवा. त्यासाठी तिघांची भिन्न व्यक्तिमत्त्वे जोपासली गेलीच पाहिजेत. नैसर्गिक स्थिती शाबूत ठेवणे, वाढते उत्पादन करणे आणि यंत्रावर माणसाला विजय मिळवून देणे या तीन गोष्टी साधल्या तर आणि तरच सुसंगतीचे अर्थपूर्ण, समृद्ध आणि शांत जीवन माणसाला लाभू शकेल. प्रवास स्वास्थ्य आणि श्रम यांच्यातील गंमत त्याला चाखता येईल.

कॉर्बुझिएच्या बांधकामामागचा आणि नगर-रचनांच्या स्वप्नांमागचा हा भव्य विचार पाहिला की मन हरखून जाते. आधुनिक माणसाला त्याने सुंदर अद्ययावत घरे आणि शहरे देण्याचा नुसता प्रयत्न केला नाही तर आधुनिक माणसाला त्याने त्याचे माणूसपणच परत देण्याचा प्रयत्न केला. आणि यातच कॉर्बुझिएची थोरवी सामावलेली आहे. माणसाच्या या ध्यासातून कॉर्बुझिएच्या जगद्विख्यात ' ल मोड्युलर ' या सिद्धांताचा जन्म झाला. घरे किती लांब हवीत, रुंद हवीत, उंच हवीत ? त्यांची दारे, खिडक्या काय मापाच्या हव्यात ? ती विशिष्ट मापांची हवी असल्यास तशीच का हवीत ? अशा समस्या वीस पंचवीस वर्षे कॉर्बुझिएच्या डोक्यात घोळत होत्या. हे चिंतन १९४५ साली अखेरीस फलद्रूप झाले. आणि याच चिंतन-संशोधनासाठी त्याला त्स्युरिच विद्यापीठाची तत्त्वज्ञान व गणित या विषयांतील डॉक्टरेटही मिळाली.

जगभर लोकांनी बांधकामे केली पाहिजेत, त्यासाठी प्री-फॅब्रिकेशन झाले पाहिजे, घराला लागणाऱ्या दारे, खिडक्या, स्लॅब्ज, भिंती यांचे उत्पादन घाऊक





अनुक्रमणिका

प्रमाणावर झाले पाहिजे, उत्पादित वस्तू एका देशातून दुसऱ्या देशात गेल्या पाहिजेत हे सारे खरे, परंतु हे घडायचे असेल तर या साऱ्या वस्तूंना आणि त्यातून निर्माण होणाऱ्या कोणत्याही वास्तूंना एकत्र एक प्रमाण–measure–लावता आले पाहिजे. हे प्रमाण कोणते ?

इंच, फूट, मीटर अशी प्रमाणे उपलब्ध आहेत, परंतु वास्तुकलेला आणि स्थापत्यशास्त्राला, मानवी समस्यांना त्यांचा फारसा उपयोग होत नाही. म्हणून ल कॉर्बुझिएने–शार्लस् एदुआर जानेरे याने–एक नवे प्रमाण शोधून काढले. मानवी शरीरावर आधारित प्रमाण. ज्या प्रमाणाचा वापर करून अनेक वास्तुरचना आणि त्याही सुसंगत रचना करता येतात ते ल मोद्युलो हे प्रमाण. अर्धा पुरुष, पूर्ण उंचीचा पुरुष, आणि हात वर केलेला पुरुष यावर आधारलेली ही मोजपट्टी इतकी खळबळजनक पण सोयीची ठरली, की वास्तुकलेतील ' लहरीपणा ' एका शिस्तीत रूपांतरित झाला. टेबलाची उंची अमुक, कारण बसलेल्या माणसाची उंची अमुक, खिडकी जमिनीपासून इतक्याच अंतरावर कारण माणसाचे डोळे इतक्याच अंतरावर, खोलीची उंची एवढीच कारण हात वर केलेल्या माणसाची उंची एवढीच अशा पद्धतीने स्वच्छ विचार करता येऊ लागला. विहीर चार पुरुष खोल आहे, पाच पुरुष खोल आहे असे बोलणाऱ्या लक्षावधी भारतीयांना ल मोद्युलो अगदी आपलेच वाटल्यास नवल ते कसले ! मोठे क्रांतिकारी शोध हे नंतर अगदी साधे वाटतात. तसेच मॉड्यूलरबाबतही वाटते. परंतु ल मोद्युलोचे कौतुक करताना आइन्स्टाईन म्हणतो, " ही प्रमाणबद्धतेची भाषा अशी काही आहे की तिच्यामुळे कोणतीही गोष्ट वाईट तऱ्हेने करता तर येत नाहीच पण सोप्या तऱ्हेने मात्र करता येते."

मॉड्युलरची महती ही की या सिद्धान्तामुळे माणसाची स्थापना आधुनिक वास्तुकलेच्या अगदी केंद्रस्थानीच झाली. मॉड्युलर ही एक ' चौकट ' (frame) आहे. सुसंगती आणि सुव्यवस्था साधणारी चौकट. साडेपांचफुटी माणसाला प्रमाण धरल्यास निर्माण होणारी प्रमाणबद्धता. (प्राचीन ग्रीकांनी अशाच प्रकारचा एक डायग्राम प्रमाण म्हणून वापरला होता ).

फर वृक्षाकडे पाहून आपल्याला हा सिद्धान्त सुचला असे कॉर्बुझिए सांगतो. फर वृक्षाच्या एका पानाचे जे प्रमाणात्मक नाते संपूर्ण वृक्षाशी, तेच नाते एका माणसाचे त्याच्या घराशी आणि त्याच्या घराचे भोवतालच्या वस्तीशी असते, ही त्याची कल्पना पाहिली, की झाडावरून पडणाऱ्या सफरचंदाकडे पाहून न्यूटनला सुचलेल्या गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धान्ताची आठवण आपल्याला येऊन जाते.

ल मोद्युलोच्या सिद्धान्तानुसार काटेकोरपणे बांधली गेलेली म्हणून मार्सेय्यच्या ल्युनिते दाबितास्सिओ या इमारतीचे महत्त्व कॉर्बुझिएच्या वास्तुकलेत अगदी अनन्यसाधारण आहे. अर्थात् त्याची इतर सारी तंत्रे येथे सुरेख तऱ्हेने त्याने वापरली आहेतच. १९४५ साली बांधलेली ही ' वस्ती ' – ही इमारत म्हणजे " हिरव्या वस्ती "चा प्रभावी प्रयोगही आहे. भोवतालच्या निसर्गाची रमणीयता येथे कोठेही बिघडलेली नाही.

मार्सेय्य बंदराजीक ला माद्राग येथे ही इतिहास घडविणारी इमारत उभी आहे. आजही ती नवी आणि टवटवीत वाटते. पांचशेच्यावर माणसे अगदी मजेत राहू शकतील अशा या इमारतीचा सर्व परिसर साडेसहा एकराचा आहे. फ्लॅट्स्‌बरोबरच येथे युवक क्लब, नर्सरीस्कूल, खेळाची व्यवस्था, तळमजल्यावरील गॅरेजेस, ही देखील आहेत. आज अनेक छोट्या मोठ्या शहरांतून ओनरशिप फ्लॅट्स्‌च्या ज्या ' सोसायट्या ' दिसून येतात त्यांचे मूळ म्हणजे ' ल्युनिते दाबितास्सिओ.'

अधिकृत आकाराची वस्ती म्हणून आणि तीही ' हिरवे नगर ' म्हणून, शहरातील वाहातुकीत पादचारी वेगळे आणि वाहाने वेगळी असे करण्याचा यत्न हवा. १०० % जमीन बगीचाच्या किंवा रानाच्या रूपात हवी. मोटारी फक्त कमी अधिक उंचीच्या वेगळ्या रस्त्यांवरून धावणार या सूत्रांचा येथे सुंदर उपयोग करून दाखविला आहे.

या उंच इमारतीचा पाया आज वैशिष्ट्यपूर्ण वाटत नाही. पण बांधला तेव्हा मात्र तो तसा वाटत होता. पायाचा प्रत्येक खांब तीन सिलेंड्रिकल पाईल्सवर आधारलेला आहे. या पाईल्स १० मीटर खोलीच्या असून दीड मीटर व्यासाच्या आहेत. पिलोटिसच्या आधारावर तयार केलेल्या कृत्रिम जमिनीचा

पृष्ठभाग १३५ मीटर लांब आणि २४ मीटर रुंद असा आहे. त्याला लांबीला काटकोनात असलेल्या १७ तुळयांचा आधार आहे. प्रत्येक मजल्यावर मधून एक 'रस्ता' वाहातो. प्रत्येक मजला हा तीन पातळ्यांचा आहे. रस्ता हा मधल्या पातळीवर आहे. आणि प्रत्येक फ्लॅट ( अपार्टमेंट ) दोन पातळ्यांवर आहे, त्यातील एक खण रस्त्याच्या पातळीवर तर उरलेले दोन किंवा तीन खण वर किंवा खाली अशा पातळ्यांवर आहेत.

इमारतीच्या अगदी वरच्या गच्चीवर गेलो, की जणू नैसर्गिक जमिनीवरच आपण आलो आहोत असे वाटते. हा भास प्रतिभासंपन्न नियोजनाचाच परिणाम आहे. गच्चीवर एक बगीचा आहे. बगीच्यात नर्सरी शाळा आहे ( तिचा संबंध १७ व्या मजल्यावरील शाळेशी आहे ). उघड्या व बंद व्यायामशाळा, सूर्यस्नानाच्या जागा, कॉफीपानगृह, पाण्याच्या टाक्या, खेळत्या हवेसाठी बांधलेली दोन कुंडे आणि धावण्याचा व्यायाम घेण्यासाठी तीनशे मीटर्सची धावपट्टी ही या प्रतलावर सुसज्ज आहेत.

प्रत्येक अपार्टमेंट बाहेरच्या रिएनफोर्सड कॉंक्रीटच्या चौकटीपासून अलग आहे. सूर्यप्रकाशापासून निर्माण होणाऱ्या उष्णतेचे वहन रोखण्यासाठी ही खास उपाययोजना आहे. प्रत्येक फ्लॅटमध्ये तीन कक्ष आहेत. स्वयंपाकघर, आई वडिलांचे शय्यागृह आणि मुलांचे शय्यागृह. बालकन्यांना सनब्रेकर्स बसविलेले आहेत. मुलांच्या खोलीतील पार्टिशन्स सरकती आहेत. त्यांच्या खोल्यांना सरकून मिटविता येतील अशा दारांच्या खिडक्या आहेत. इमारतीच्या बाजूंना पुरेसे सनब्रेकर्स आणि क्लॅडिंग्ज आहेत. दोन्ही कॉंक्रीटमधील. तळमजल्यावर बाहेरच्या मुख्य दर्शनी भिंतीवर ल मोडयूलर दाखविणाऱ्या मानवाकृती, सिमेंटमध्ये उमटविलेल्या आहेत. कायम टिकतील अशा तऱ्हेने.

मनुष्य घरात राहातो. घरात त्याला ( खासगी ) एकांत मिळतो. त्यात त्याचे व्यक्तिमत्त्व वाढते. त्याच वेळी तो भोवतालच्या वस्तीतून समाजाशी बांधला जातो. त्याचे सामाजिकीकरण होते. झोपडी, तंबू किंवा गुहा ही आदिमानवाची अपार्टमेंटस्च होत. पण ही वस्तीशी जोडलेलीच हवी असतात. हा मूलभूत समतोल ल्यूनिते दाबितास्सिओ मध्ये त्याने साधला आहे. घराची सूत्रे अपार्टमेंट्साठी आणि वस्तीची सूत्रे मोठ्या इमारतीसाठी. म्हणजे एका सुंदर भव्य चौकटीत लहान लहान चौकटी. एक तिसर्गाला धरून निर्माण केलेली व्यवस्थिती ( order ). ल्यूनिते एक लहान नगरासारखीच आहे. तिचे उपनियम रस्ते, दुकाने, उद्याने असणाऱ्या नगरनियमांप्रमाणेच. परंतु ही चौकट, ही व्यवस्थिती 'माणूस' या प्रमाणाशीच निगडित आहे. तिच्यात गणिती अचूकपणा असला तरी यांत्रिक निर्जीवता मात्र नाही.

वास्तूसंबंधीचा कॉर्बुझिएचा आदर्श 'ल्यूनिते' त साकार झाला आहे तर त्याचा नगररचनेचा आदर्श चंडीगढच्या निर्मितीत आविष्कृत झाला आहे. १९३० सालापासून म्हणजे 'La Ville radieuse' हे प्रदर्शन भरविल्यापासून कॉर्बुझिए आदर्श नवे शहर वसविण्याचे स्वप्न उराशी बाळगून होता. ब्यूनॉस आयर्समधील घृणास्पद अस्तित्वाने त्याला मुळातून अस्वस्थ केले होते ते कायमचे. प्रत्येक सेक्टरमध्ये फक्त हजार माणसे. नीट आखलेले रस्ते. भुयारी रस्ते. मोठमोठाले बगीचे. शहराच्या केंद्रस्थानी गगनचुंबी इमारती. आदर्श तीस लाखांचीच वस्ती. अशी अनेक वैशिष्ट्ये असलेली नगरी त्याला उभारायची होती. एखाद्या सम्राटालाच साजेशी ही आकांक्षा होती. फ्रेंच सिंडिकॉलिस्ट काय, रशियन कम्युनिस्ट काय किंवा इतालियन फाशिस्ट काय कोणीच त्याला प्रतिसाद दिलेला नव्हता. पेसाक, दालिरमॉंसारख्या ठिकाणी त्याला फारतर 'सोसायट्या' बांधायला मिळाल्या होत्या. याचे कारण ज्यांच्या गळी तो आधुनिक शहरनिर्मितीची कल्पना उतरवू पहात होता ते तोंडाने जरी क्रांतीच्या गप्पा मारणारे होते तरी मनाने मध्ययुगीन वास्तुकलेच्याच कल्पनांना चिकटणारे होते. परंतु कॉर्बुझिएचे नशीब उशिरा का होईना पण उघडले, आणि तेही भारतासारख्या परंपराप्रिय, गरीब देशात. याचे कारण भारतातही त्याच्याचसारखा एक 'स्वप्नाळू' युगपुरुष वावरत होता. त्याचे नांव होते पं. जवाहरलाल नेहरू.

कॉर्बुझिएने वसविलेले, कल्पिलेले चंडीगढ शहर ही एकसंध रचना आहे. एकमेकाला छेदणाऱ्या उभ्या आडव्या अक्षांची रचना. येथे पार्क्स, बाजार, रस्ते

अनुक्रमणिका

हे सारेकाही प्रत्येक सेक्टरचा विचार करून वसविले आहेत. लहान सहान बाबींचादेखील विचार करण्यात आलेला आहे. कॉर्बुझिए म्हणतो, "गरीबातल्या गरीब नागरिकांना प्रतिष्ठित जीवन जगता यावे व त्यांना सुखसोयी उपलब्ध व्हाव्यात म्हणून हे बांधण्यात आले आहे. आणि हे शहर प्रशासनाचे शहर आहे. त्याचे कार्य निश्चित असून त्याच्या रहिवाशांची गुणवत्तादेखील त्यास पूरक असणार हे गृहीत धरलेले आहे". म्हणजे हे औद्योगिक शहर नाही, हे उघड आहे.

चंडीगढ ही राजधानी प्रथम नॉविकी व मायर हो वास्तुशास्त्रज्ञ वसविणार होते. त्याचा बाह्य आराखडा कॉर्बुझिएनी फारसा बदललेला नाही. शहरातील प्रत्येक सेक्टर २२५ एकरांचा आणि साधारणपणे स्वयंपूर्ण केलेला आहे. राजधानीच्या मुख्य कार्यालयांचा समूह (capito line complex) शहराच्या वायव्येस वरच्या बाजूला आहे. प्राथमिक आराखडा विलक्षण आत्मविश्वासाचे प्रतीक आहे, आणि तरीही तो भारतीय स्थापत्यशास्त्रज्ञ आणि वास्तुशास्त्रज्ञ यांच्याशी सल्लामसलत न करता केलेला नाही. हा आराखडा (आणि पर्यायाने शहर) एखाद्या व्यक्तीसारखा आहे असे जेन ड्रयू ही कॉर्बुझिएची सहकारी वास्तुकलावंत म्हणते. कॅपिटोलाईन वास्तूंचा समूह मस्तकाप्रमाणे आहे. नगराचे व्यवसाय-केंद्र हृदय, औद्योगिक विभाग हे हात, सेंट्रल मार्केट हे पोट, लोकवस्त्या हे शरीर, तर रस्ते शिरा आणि नसांप्रमाणे आहेत. The master plan is of poetic significance. It is almost biological in it's form.

राजधानी म्हणून चंडीगढला विशेष वजन प्राप्त करून देण्याचा कॉर्बुझिएचा यत्न दिसतो. पाहाणाराला पॅरिसचा प्रभाव जाणवतोच. चंडीगढच्या महत्त्वाच्या मानाने वास्तुरचना फारच टेचाची आहे असे काहींना वाटते ते यामुळेच असावे. अर्थात् सत्य नेमके उलट आहे.

चंडीगढच्या मूळ आराखडचाचे वैशिष्टय हे, की तो दोन पातळ्या आणि दोन प्रमाणांना एकत्र सांधून घालतो. शहराची भौमितिक चौकट मोठ्या बिल्डिंग्ज, वेगाची वाहतूक, राहण्याच्या वस्त्या यांना एकत्रित बांधते आणि दुसरे म्हणजे सेक्टर्सच्या अंतर्गत जीवनालाही ती बांधते.

मूळ आराखडचानुसार साकार झालेले आणि होत जाणारे चंडीगढ आज दिमाखाने उभे आहे. जगभरचे प्रवासी तेथे येतात. भारतीयांच्या दृष्टीने तर ते आधुनिकतेचे महान् "लेणे" आहे. कोकणातलाच काय पण पुण्यामुंबईचा सुशिक्षित मनुष्यही जेव्हा चंडीगढला आवर्जून जातो, तेव्हा दबकतो. मनात चपापतो. एकाददुसरी आधुनिक इमारत पाहाणे वेगळे आणि आधुनिक इमारतींनी परिपूर्ण असलेले शिस्तबद्ध आधुनिक शहर पाहाणे वेगळे. मुंबईतल्या स्कायस्क्रॅपर्सही त्याला चंडीगढ पाहाण्यातला आनंद देऊ शकत नाहीत. त्या त्याला स्तिमित आणि खिन्न करतात.

भारताचा जेव्हा कायापालट होईल तेव्हा भारतातील शहरे किमान (?) चंडीगढसारखी असतील अशी ग्वाही तो स्वतःच्या मनाला देतो. अगदी आहे त्या स्वरूपातही चंडीगढ महान् कलावंताच्या प्रतिभेचा युगशाली आविष्कार आहे.

अगर फिर्दोस वर रु–ए जमीं अस्त
हमीन अस्तो हमीन अस्तो, हमीन अस्त !

हे काव्य कोणालाही येथे आठवू शकते. अनेक छोटया मोठ्या गावांचे चंडीगढसारख्या आधुनिक रचनांत रूपांतर करणे ही भारतीय मनाची ऐहिक आकांक्षा असू शकते. आणि ती एखाद्या ताजमहाल बांधण्याच्या किंवा दयाळबाग उभारण्याच्या आकांक्षेपेक्षा कितीतरी पटीने भव्योदात्त आहे. कारण 'अवघाची संसार सुखाचा करीन' अशी व्यापक उर्मीची जोड तिला असते.

चंडीगढ उभारीत असताना कॉर्बुझिएला काही कल्पनांनी झपाटले होते. त्यातील दोन महत्त्वाच्या कल्पना म्हणजे The seven V's – les sept voies ची आणि Sector ची. या दोन कल्पना आजही गाजत आहेत. शहररचना करताना वाहतूक नियंत्रण करण्यासाठी कॉर्बुझिएनी सात प्रकारचे रस्ते बांधले आणि नागरिकांना स्वास्थ्य लाभावे म्हणून वस्त्या सेक्टर्समध्ये, मोहोल्ल्यांमध्ये विभागल्या. पण हे सेक्टर्स म्हणजे नुसत्या पेठा नव्हेत, तर दैनंदिन गरजा भागविणारी दुकाने,

अनुक्रमणिका

क्रीडांगणे, पार्क, शाळा, इत्यादिंनी स्वयंपूर्ण असणारे विभाग.

एकेक सेक्टर साधारणपणे अर्धा मैल रुंद आणि पाऊण मैल लांब आहे. एका सेक्टरमध्ये ५ ते १५ हजारापर्यंत लोकवस्ती, असे पस्तीसावर सेक्टर्स. सेक्टर्समधून चौदा प्रकारची विविध आर्थिक स्तरातील लोकांना परवडतील अशी घरे आहेत. सरकारी घरांचे प्लॉटस ३७।। चौरस यार्डापासून ४००० चौरस यार्डांपर्यंत आहेत. तर खाजगी घरांचे प्लॉट्स ७५ चौरस यार्डापासून ५००० चौरस यार्डांपर्यंत आहेत.

मोठ्या शहरातून व्यक्ती एकाकी पडते. तिला आपल्या लोकांत, आपल्या भागात राहिल्याचे समाधान मिळत नाही. हे समाधान मिळावे म्हणून सेक्टर्स निर्माण केलेले आहेत. मोठ्या शहरात छोटी 'गावे' निर्माण केलेली आहेत. भारतीय समाजात वर्गव्यवस्थेपेक्षा जातीपातींचे बारकावे फार असतात हे लक्षात न घेतल्याने सेक्टर-व्यवस्था फारशी यशस्वी मात्र झालेली नाही. हे खरे असले, तरी सेक्टर्सपेक्षा उचित व्यवस्था आज तरी सापडलेली नाही असे शहररचना तज्ज्ञ सांगतात.

शहरात मोठमोठ्या जागा पुढील काळातील



उद्योगधंद्यांच्या वाढीसाठी राखून ठेवलेल्या आहेत. रस्ते सुंदर व प्रशस्त आहेतच; पण त्यांच्यावर लावलेली झाडी विचारपूर्वक लावली आहे. ही झाडी सर्व ऋतूंत शहर रंगीबेरंगी राखते. स्वास्थ्य दरी म्हणते गुलाबांचे उद्यान आहे. शहरात जागोजागी हिरवळींचे पट्टे आहेत. भारतात तरी इतके छान रस्ते व मोकळ्या जागा असलेले शहर दुसरे नाही. जेन ड्रयू, मॅक्सवेल फ्राय यांनी केलेल्या नियमानुसार (नशीब आपली नोकरशाही येथे गप्प होती) शेकडो, हजारो, सुंदर सुंदर घरे बांधण्यात आलेली आहेत. त्यांचे झोनस् पाडण्यात आले आहेत आणि प्रत्येक झोनला स्वतःचे असे रुपडे आहे. इतके चांगले झोनस् तर जगाच्या पाठीवर कोठे नाहीत असे म्हटले जाते.

विधान परिषद, मंत्रालय, हायकोर्ट, एम्. एल्. ए. फ्लॅटस्, एम्. एल्. ए. हॉस्टेल, गव्हर्मेंट कॉलेजेस, क्लब हाऊस, मेडिकल हॉस्पिटल व एन्क्लेव, गव्हर्नर्स पॅलेस, चंडीगढ विद्यापीठ व हॉस्टेल, सर्किट हाऊस, गांधी भवन, ॲडमिनिस्ट्रेशन बिल्डिंग, बिझनेस डिस्टिक्ट, टाईप–३ घरे, किरण सिनेमा थिएटर अशा अनेक इमारती अक्षरशः डोळ्याचे पारणे फेडतात. वारंवार पाहात राहावीत, अभ्यासावीत अशी ही सुंदर वास्तुशिल्पे आहेत. कॉर्बुझिए आणि त्याच्या सहकाऱ्यांच्या परिपक्व प्रतिभेचे ते विलक्षण आविष्कार आहेत.

चंडीगढची निर्मिती शिस्तबद्ध आहे आणि यापुढेही तशी राहावयास हवी. आर्थिक शिस्त, वातावरणाची शिस्त आणि यंत्रविज्ञानाची शिस्त यांचे कॉर्बुझिएने सतत भान ठेवले होते. सावली, हवेचे प्रवाह आणि जलप्रवाह यांचे नियंत्रण करणारे येथील Grille Climatique चे तंत्र तर विशेष मानले जाते. माती, दगड व वाळू यांचा मोठ्या प्रमाणावर वापर केल्याने येथील बांधकामात जो चकचकीत आणि गुळगुळीतपणाचा अभाव निर्माण झाला आहे तोही विलोभनीय आहे. चंडीगढसारख्या ११५ फॅ. ही. पर्यंत तपमान जाणाऱ्या उष्ण ठिकाणी आणि भारतीय संदर्भात बांधकाम करण्यासाठी कॉर्बुझिएच्या मूळ विचारांची दिशा बदललेली दिसत नाही, ही फार मोठी अर्थपूर्ण घटना आहे. मार्सेय्य येथे व ब्राझीलमध्ये, रफ काँक्रीट आणि मोठाले सन ब्रेकर्स त्याने मोठ्या प्रमाणावर वापरले होते. हीच तंत्रे चंडीगढमध्ये जोरदारपणे वापरण्यात आली आहेत.

अर्थात् चंडीगडविषयीही तक्रारी आहेतच. शहर वसवायला सुरुवात होऊन आज सुमारे पंचवीस वर्षे होऊन गेली. तेव्हा दोष, त्रुटी लक्षात येणे स्वाभाविक आहे. गायी गुरे ठेवण्याची मुभा व सोय नाही. लोकल वाहने नीट नाहीत. राहाणी महागडी झाली आहे. दफनविधीला सोयीची जागा नाही. संपर्कव्यवस्था नीट नाही. जीवनात उथळपणा येतो आहे. येथे खोल श्रद्धांचा साक्षात्कार घडू शकत नाही. कामगार-वर्ग निरक्षर आहे. गव्हर्मेंट शाळांतील व्यवस्थापन गचाळ आहे. पिण्याचे पाणीही स्वच्छ नसते. धर्मशाळा नाहीत. सार्वजनिक स्नानगृहे व मुताऱ्यांची चणचण भासते. कॅपिटोलाईन वास्तु आणि राहण्याची घरे यांच्या बांधणीत गुणात्मक फरक फार वाटतो. नवीन बांधकामे अनुकरणात्मक व जाचक नियमांनुसार झाल्याने निर्जीव वाटतात. शहरात राहाणे बांधकामातील एकसाचेपणामुळे बोअरिंग होते. V–4 प्रकारचे रस्ते निष्प्रभ वाटतात. ते धड भारतीयही दिसत नाहीत की धड युरोपीयही वाटत नाहीत. इमारतीत वैविध्य दिसत नाही. पत्ते सापडणे कठीण जाते. आर्थिक क्षमतेप्रमाणे वस्त्या उगाच विभागल्या गेल्या आहेत. मुद्दाम मोकळ्या सोडलेल्या जागा धुळीने भरल्या आहेत. त्या चांगल्या ठेवायला फार जिकीर पडते. अशा एक ना अनेक भल्याबुऱ्या तक्रारी चंडीगढविषयी केल्या जातात. पण त्या सर्वांचा विचार केला तरीही चंडीगढचे निर्विवाद श्रेष्ठत्व मनावर ठसतेच ठसते. कारण कितीही झाले तरी चंडीगढ हे एकजीव आणि संपूर्ण 'प्लॅन' केले गेलेले आधुनिक शहर आहे. चंडीगढचा 'वास्तुपाठ' प्रत्येक भारतीय म्युनिसिपालिटीतून, कार्पोरेशनमधून सतत शिकविला गेला पाहिजे. प्रत्येक स्थापत्याच्या आणि वास्तुकलेच्या विद्यार्थ्याला त्याचे पुरेसे आकलन करून दिले गेले पाहिजे यात शंकाच नाही.

चंडीगढचे सर्व बांधकाम पूर्ण झाल्यावर त्याच्या जीवनकार्याचे सार सांगणारे एक प्रतीक कॉर्बुझिए या शहराच्या मध्यभागी उभारणार होता. पं. नेहरूंना लिहिलेल्या पत्रातून त्याने या प्रतीकाची

कल्पनाही मांडली होती. हाताच्या पसरलेल्या पंजाचे (The open hand) हे भव्य प्रतीक होते.

Pleine main j'ai recu
Pleine main je donne.

'हात भरभरून मी घेतलं, मी देत आहे देखील हात भरभरून' या एकेकाळी लिहिलेल्या त्याच्या कवितेतील भावना तो यातून व्यक्त करणार होता. नव्याने निर्माण झालेली संपत्ती घेणारा आणि ही संपत्ती इतरांना वाटणारा हात. यंत्रयुगातील दुसरे पर्व सुरू झाले आहे, सुसंवादाचे पर्व सुरू झाले आहे हे सांगणारा हात. भगवान् बुद्धांच्या बोधिसत्त्व हाताची आठवण करून देणारा हात. यंत्रविज्ञानामुळे जे नवे, दुसरे आधुनिक युग अवतरत आहे ते सुसंवादाचे आणि वैभवाचे असेल ही कल्पना नेहरू नेहमी मांडीत असत. त्यामुळे हा हात नेहरूवादाचे प्रतीकही ठरणार होता. परंतु चंडीगढचे बांधकाम अपुरे असतानाच ल कॉर्बुझिएला (कॅप मार्टिनच्या समुद्रकिनाऱ्यावर पोहोताना, २७ ऑगस्ट, १९६५ रोजी) मृत्यु आला. त्यामुळे ही कल्पना कधीच प्रत्यक्षात आली नाही.

सतत नवी नवी आव्हाने स्वीकारणे, अर्थपूर्ण नाविन्याचा सतत पाठपुरावा करणे हा कॉर्बुझिएच्या व्यक्तिमत्त्वाचा धर्मच होता. ला शो द फाँ या ठिकाणी त्याने त्याच्या व्यवसायास प्रारंभ केला. तेथील कामात देखील त्याने पारंपरिक कित्ते गिरविलेले दिसत नाहीत. झाडांचा अनेक दृष्टीने केलेला अभ्यास वास्तुरचनेत आणण्याची त्याची धडपड दिसते. १९१२–१४ च्या काळात विला फावर जाको सारख्या बांधकामातून त्याने 'दि गार्डन सिटी' चळवळीची आव्हाने स्वीकारलेली दिसतात, तर विला श्वोब येथे गच्चीवर मोठी बाग केलेली आढळते. गुस्ताव बेकच्या माळरानात सिते जारदँची कल्पना वृक्षांच्या ओळीने रांगा, अर्धवर्तुळाकार आकार आणि कुंज यातून साकार केलेली दिसते. समस्यांना आणि आव्हानांना सामोरे जाण्याची ही वृत्ती कॉर्बुझिएनी शेवटपर्यंत जोपासली हे विशेष. प्रसिद्धीच्या ऐन शिखरावर असताना देखील रौशाँप सारख्या चर्चबांधणीचा संपूर्ण धाडसी प्रयोग त्याने केलेला दिसतो आणि सर्व प्रतिष्ठा पणाला लावलेली दिसते.

झालेल्या चुकांपासून योग्य तो बोध घेऊन स्वतःच्या कल्पनात आणि तंत्रात सुधारणा घडवून आणण्याची कॉर्बुझिएची शक्ती केवळ अचाट होती. अत्यंत आत्मविश्वास असणाऱ्या या प्रतिभावंताला अहंकाराचा वारा फारसा शिवलेला दिसत नाही. पेसाक येथे पोन्से याने वापरलेले सिमेंट गनचे तंत्र अयशस्वी आहे हे पटताच कॉर्बुझिएने ते दूर ढकलण्यात कसूर केली नाही. किंवा पेसाकच्या वसाहतीबाबत (१९२५) गिऱ्हाईकांनी जेव्हा स्वयंपाकघरे अपुरी आहेत, त्यातून दिवाणखान्यात प्रवेश करावा लागतो, सामान सांचवायला अपुरी जागा आहे, भिंतीत कपाटेच नाहीत, जिने अरुंद वाटतात, यासारख्या तक्रारी केल्या, तेव्हा त्याने हे सर्व दोष पुढील बांधकामात कटाक्षाने टाळलेले दिसतात. वास्तुकलावंत चुकतो, जीवन कधीच चुकत नाही या त्याच्या धारणेतच त्याच्या विलक्षण विकासाचे बीज आहे.

कॉर्बुझिए नावीन्याचा वेडा खराच; परंतु हे नावीन्य त्याने समन्वयाचा नवा आविष्कार करून साधलेले वेळोवेळी दिसून येते. ही गोष्ट लक्षात घेतली की कॉर्बुझिए रोमँटिक आहे की क्लासिकल आहे ? यंत्रवादी आहे की निसर्गवादी आहे ? आदर्शवादी आहे की वास्तववादी आहे ? अशासारखे प्रश्न चटकन् खुळे ठरतात.

त्याची दोमिनो सिस्टम पाहा. तीन क्षैतिजिक स्लॅब्ज्, सहा खांब आणि या पातळ्यांना जोडणारा जिना अशी ही साधी परंतु प्राथमिक महत्त्वाची रचना आहे. कमालीचा गुळगुळीतपणा, दृश्य आणि काल्पनिक साधेपणा, खांब आणि स्लॅब्ज यांचा विशुद्ध मिलाफ ही या रचनेची वैशिष्टचे. परंतु रोमँटिसिझम आणि क्लासिकल विवेक हे यात किती सुंदर तऱ्हेने एकत्र आले आहेत ! आधुनिक तंत्रवैज्ञानिक युगातील वस्तू, सामग्री काव्यमय, रोमँटिक आणि गूढ चौकटीत अशा तऱ्हेने तो ठेवतो की त्यांचे आध्यात्मिक रूपांतरच घडून यावे. हे सूत्र त्याच्या जीवनाच्या अखेरीपर्यंत केलेल्या बांधकामांतून दिसत राहाते. यंत्रयुगाचा पुरस्कार करणारा हा गणिती वास्तुशास्त्रज्ञ रोशाँपच्या चर्चसारखे वास्तु-

काव्य निर्माण करतो, यांत्रिक क्रांतीची महती गाताना पार्थेनॉनच्या अभिजात मंदिराचा अभ्यासपूर्ण गौरव करतो, आकडेमोडीत रंगला असतानाच निसर्गाचे वेध घेतो ते काही उगाच नाही. समन्वयातूनच त्याचे कार्य उभे राहिले आहे.

कॉर्बुझिएच्या इमारती काळाच्या ओघात कदाचित कमी आधुनिक ठरतील, वाटतील; परंतु त्याची वास्तुशास्त्राच्या मागची दृष्टी नेहमीच टवटवीत आणि प्रेरणा देत राहील. नैसर्गिक जगाविषयीचा कॉर्बुझिएचा मूलभुत दृष्टिकोण आशावादीच आहे. सुसंगती, संवाद असलेले दयार्द्र आणि काव्यात्म वास्तव म्हणून तो निसर्गाकडे पाहातो. समतोल आणि सुसंगती ही त्याच्या निसर्गजगताची मर्मे आहेत.

त्याचा माणसावरील विश्वास जबरदस्त आहे. मानव निसर्गाचे अपत्य आहे. तो निसर्गाचे नियम जर समजावून घेईल आणि निसर्गाच्या अखंड प्रवाहाशी स्वतःचे जीवन जुळवून घेईल तर सुसंवाद आणि संगतीचा सतत अनुभव त्याला येईल आणि हा अनुभव मानवाला श्रेयस्करही ठरेल. निसर्गातील संगती जाणणे आणि तिच्यात सहभागी होणे ह्यात सर्वोच्च समाधान आहे. ऐहिक, जड सुखसोयी मिळविण्यात समाधान नाही हे कॉर्बुझिए ठामपणे सांगतो. ढोबळ जडवादाचा तर तो तिरस्कारच करतो.

कॉर्बुझिएचा गुणवान् महाजनसत्तेवर विश्वास होता, पण जनसामान्यांच्या कल्याणासाठी झटणारी शुभशक्ती म्हणून. मार्क्सची वर्गसंघर्षाची कल्पना त्याला पूर्णपणे परकी होती. यंत्रशक्तीचा अचूक आणि यथायोग्य वापर करून घेतला गेला तर पृथ्वीवरच स्वर्ग अवतरेल असा विश्वास त्याच्या लिखाणात जागोजाग व्यक्त झालेला दिसतो. यंत्रयुग आणि निसर्ग यांची सांगड न घातल्याने सध्याचे घृणास्पद जीवन निर्माण झाले आहे असे त्याला वाटते. यंत्रे मोडून तोडून टाकण्याची व निसर्गाकडे परत फिरण्याची भाषा कॉर्बुझिएत कोठे दिसत नाही. उलट रेखीव यांत्रिक संस्कृती आणि निसर्ग यांचा मिलाफ घालण्याची पूर्ण शक्यता त्याने गृहीत धरलेली दिसते.

कॉर्बुझिएने भविष्यकाळात पाहाणाऱ्या प्रेषिताची भूमिका जाणूनबुजून स्वीकारली. यामुळे वाईट समाजशास्त्र, वंध्या राजकारण आणि गळणारी छपरे यांना त्याला तोंड द्यावे लागले हे खरे असले तरी या भूमिकेमुळेच आधुनिक वास्तुकलेने सामाजिक बांधिलकी स्वीकारली, आणि तिला गांभीर्य आणि खोली प्राप्त झाली. काळ उलटतो आहे तसे कॉर्बुझिएचे मोठेपण आणि प्रभाव वाढतच चालले आहेत.

व्यक्ति म्हणून कॉर्बुझिए कसा होता याची फारशी माहिती उपलब्ध नाही. परंतु त्याची सहकारी इंग्लिश मैत्रीण जेन ड्रू हिने त्याचे हृद्य शब्दचित्र रंगविले आहे. त्यात ती म्हणते :

> 'ल कॉर्बुझिए' या टोपण नावाने शार्लस् एदुआर जानेरे जगाला ज्ञात आहे. कॉर्बुझिएची राहाणी साधी होती. मित्रांना पत्रे, फोटोग्राफ व चित्रे पाठविण्याची त्याला फार आवड होती. 'कॉर्ब' मित्र म्हणून फार चांगला होता. त्याची सही म्हणून तो लहानसे कावळ्याचे चित्र वापरी.

तो काहीसा अहंकेंद्री होता. पण अहंकारी मात्र नव्हता. त्याला विनोदाची आवड होती. त्याचे निसर्गप्रेम उत्कट होते. पांढऱ्या रंगाचे त्याला वेड होते पण भडक रंगही त्याला आवडत. अगदी सकाळी तो चित्र काढी आणि नंतर एकटा बसून वास्तुकलेच्या समस्यांवर विचार करी. खेळ, व्यायाम आणि गप्पा त्याला आवडत.

त्याचे वागणे संन्याशासारखे असे. त्याच्या वागणुकीतील वा कलेतील प्रत्येक गोष्टीचे तो स्पष्टीकरण हुडके. त्याची जीवनदृष्टी नैतिक होती. गणित, व्यवस्थिती आणि जीवनावर त्याची निष्ठा होती. त्याने लग्न केले नाही. तो म्हणे, 'कामाच्या व्यापामुळे मला वेळच उरत नाही.' पण स्त्रियांच्या प्रेमाचा तो आदब राखी. काही स्त्रिया त्याला फार आवडत. त्याची मातृभक्ती उत्कट होती.

कॉर्ब कमालीचा हजरजबाबी होता. अमेरिकेविषयी त्याला तिटकारा वाटे. अमेरिकनांचे उथळे जीवन त्याच्या काटकसरी स्वभावाला मानवत नसे. अशीले त्याला काय पैसे देतात याची त्याला फारशी फिकिर नसे. स्वस्त घरे आणि मोठ्या बिल्डिंग्जमध्ये त्याला सारखाच रस वाटे.

मोगल इमारतींचे आकार, भारतीय स्त्रियांच्या साड्या त्याला आवडत. त्याची बुद्धी बारीकसारीक गोष्टीतही नावीन्य शोधीत असे. वर्तमानपत्राच्या बातमीदारांना तो मोजीत नसे. समाजात फारसा मिसळतही नसे. कोणाबरोबर घनिष्ट संबंध जोडायचे याचे त्याचे एक गणित होते. स्वतःविषयी बोलणे त्याला आवडे. आपण फ्रेंच आहोत याचा त्याला अभिमान वाटे.

कॉर्बेला संघर्षमय जीवन जगावे लागले; परंतु तो नाजूक आणि आदबशीर होता. मानमरातबाची त्याला फिकिरच नव्हती असे म्हणता येत नाही. इंग्लंडच्या राणीकडून सुवर्णपदक घेताना तो गहिवरून गेला होता.

त्याला सत्याचे जे 'दर्शन' झाले होते त्याच्याशी तो एकनिष्ठ राहिला.

विसाव्या शतकातील आपल्या दुसऱ्या आधुनिकतेला इतक्या मोठ्या प्रमाणावर आणि इतक्या भरीव स्वरूपाचे योगदान करणारे प्रतिभावंत फारच थोडे आहेत. त्यातही केवळ विधायक परिणाम करणारे हे कार्य असल्याने त्याचे महत्त्व विशेष आहे. अनेक संकटे आणि अडचणी आल्या तरी कॉर्बुझिएने कधीही त्याची उच्च ध्येये आणि कणखर ध्येयवाद सोडला नाही. कधीही म्हणजे कधीही सोडला नाही. विसाव्या शतकाच्या रंगमंचावर एखाद्या शोकात्म नायकाप्रमाणे तो प्रतिकूल परिस्थितीशी आणि नियतीशी झगडत राहिला. आणि त्याने स्वतःचेच नव्हे तर तुमचे आमचे जीवनही अर्थपूर्ण करण्याची धडपड केली. मरणापूर्वी काहीच दिवस आधी काढलेले त्याचे उद्‌गार आधुनिक माणूस विसरू शकणार नाही, –

"'J'ai 77 ans et ma morale peut se re'sumer a ceci: dans le vie il faut faire. C'est-a-dire agir dans la modestie, lexactitude, la prècision. La seule atmosphere pour une creation artistique cest la regularite, la modestie, la continuite, la perseverance......"

"मी ७७ वर्षांचा आहे. आणि माझ्या सिंहावलोकनाचे सार हे, की जीवनात काहीतरी करून दाखविलं पाहिजे. म्हणजे असं की नम्रता, अचूकपणा आणि बारकावा बाळगून काही कार्य केलं पाहिजे. कलात्मक निर्मितीला योग्य असे एकमेव वातावरण म्हणजे नियमितपणा, नम्रता, सातत्य आणि चिकाटी यांचे......"

---





अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रभाकर पाध्ये

# ऐतिहासिक भौतिकवाद (पूर्वार्ध)

ऐतिहासिक भौतिकवादाची पहिली मांडणी मार्क्सने १८४६ साली, 'द जर्मन आयडिऑलॉजी' मध्ये केली. तेथे त्याने म्हटले, "कल्पना, संकल्पना, जाणीव या गोष्टी प्रथम मानवांच्या भौतिक जीवनोद्योगाशी आणि भौतिक जीवन-विनिमयाशी विणलेल्या असतात-म्हणजेच खऱ्याखुऱ्या जीवनाच्या भाषेशी विणलेल्या असतात. मानवांचे संकल्पन, वैचारिकता, त्यांचे बौद्धिक दळणवळण हा अद्याप या अवस्थेत त्यांच्या भौतिक बर्तनाचा सरळसरळ स्राव असतो. राज्यशास्त्र, कायदा, नीतिशास्त्र, धर्म, आदितत्त्वमीमांसा - यांच्या भाषेत व्यक्त झालेल्या लोकांच्या बौद्धिक उत्पादनालाही हीच गोष्ट लागू आहे. उत्पादन-साधनांचा निश्चित विकास आणि त्याला जुळणारा परस्परविनिमय यांनी ज्यांची जीवनस्थिती निर्माण झालेली ( conditioned ) असते अशी खरीखुरी माणसे हीच आपल्या कल्पना-संकल्पना वगैरेंची, त्यांच्या अधिकात अधिक विकासाची उत्पादक असतात [ हस्तलिखितात हे वाक्य मूळात असे होते : माणसे ही आपल्या कल्पना-संकल्पना वगैरेंची उत्पादक असतात-तीच माणसे की ज्यांची स्थिती ( condition ), त्यांच्या भौतिक जीवनाच्या उत्पादनपद्धतीने, त्यांच्या भौतिक विनिमयाने आणि त्यांच्या सामाजिक व राजकीय रचनेच्या पुढील विकासाने ठरलेली असते. ] जाणीव ही जाणीवयुक्त अस्तित्वतेखेरीज दुसरे काही असू शकत नाही, आणि माणसांची अस्तित्वता म्हणजे त्यांची प्रत्यक्षातली जीवन-प्रक्रिया ... स्वर्गातून पृथ्वीवर उतरणाऱ्या जर्मन तत्त्वज्ञानाच्या हे अगदी उलट असते. येथे पृथ्वीवरून स्वर्गात चढण्याचा प्रश्न असतो. म्हणजे येथे माणसे जे काय म्हणतात, ज्याची कल्पना करतात, जे काही विचार योजतात, किंवा माणसांबद्दल जे काही सांगितले जाते, त्यांच्याबद्दल जो विचार केला जातो, जी कल्पना केली जाते, ज्या संकल्पना बांधल्या जातात, त्यांच्यापासून सुरुवात करून हाडामासांच्या माणसांपर्यंत येण्याचा प्रश्न नसतो, तर जगण्यात गर्क असलेल्या खऱ्याखुऱ्या माणसांपासून सुरुवात करून, त्यांच्या खऱ्याखुऱ्या जीवनप्रक्रियेच्या पायावर, त्यांच्या वैचारिक प्रतिक्रिया आणि त्यांच्या जीवन-प्रक्रियेचे प्रतिध्वनी यांच्या विकासाचे दर्शन घडविण्याचा प्रश्न असतो. माणसांच्या मेंदूत तयार झालेले सारे विभ्रमसुद्धा निश्चितपणे त्यांच्या भौतिक जीवन-प्रक्रियेची उन्नयने असतात. या जीवन-प्रक्रियेचा आनुभविक वेध घेता येतो आणि तिला भौतिक प्रमेयांचा पाया असतो. नीतिशास्त्र, धर्मशास्त्र, आदितत्त्वमीमांसा आणि विचारप्रणालीचे इतर प्रकार, त्याचप्रमाणे त्यांच्याशी जुळणारे जाणिवेचे प्रकार-यांना यानंतर अर्थातच आपल्या स्वातंत्र्याचा देखावा मांडता येत नाही. त्यांना काही इतिहास नसतो, त्यांचा काही विकास नसतो. तर माणसे, आपले भौतिक उत्पादन आणि दळणवळण यांचा विकास करताकरता, आपल्या खऱ्याखुऱ्या प्रत्यक्ष जगाबरोबर आपले विचार आणि त्यांचे उत्पादन यात बदल करीत असतात. जाणिवा जीवन ठरवीत नसतात, तर जीवन जाणिवा ठरवीत ( determine ) असते. पहिल्या प्रकारच्या दृष्टिकोणात जिवंत व्यक्तीच्या रूपात वावरणारी जाणीव हा प्रारंभबिंदू असतो, तर दुसऱ्या खऱ्याखुऱ्या जीवनाशी जुळणाऱ्या दृष्टिकोणात खरीखरी जिवंत व्यक्ती हा प्रारंभबिंदू असतो, आणि जाणिवेकडे तिची जाणीव म्हणून पाहिलेले असते. या दृष्टिकोणाला काही प्रमेय नसते असे नाही. खऱ्याखुऱ्या

अनुक्रमणिका

प्रमेयापासून त्याची सुरुवात होते, आणि हे प्रमेय कधीही दृष्टीआड होत नाही. हे प्रमेय म्हणजे माणसे. विलक्षण निबद्ध आणि अलिप्त अशी माणसे नव्हेत तर आनुभविक निरीक्षण करता येईल अशा निश्चित विकसन-प्रक्रियेत वावरणारी माणसे. अशा क्रियाशील जीवनप्रक्रियेचे वर्णन केले की, इतिहास हा, ( अद्याप स्वतःच अमूर्त असलेल्या ) आनुभविक तत्त्वज्ञांचा मृत घटनांचा संग्रह उरत नाही की, आदर्शवाद्यांची काल्पनिक व्यक्तींची काल्पनिक कृती राहत नाही." (पृ. ४७–४८).

या उताऱ्यात मार्क्स कशावर भर देत आहे ते पाहण्यासारखे आहे. तो सांगतो आहे, की मानवाचे बौद्धिक जीवन त्याचे भौतिक जीवन, या भौतिक जीवनाचा व्याप आणि व्यापार यांच्यांत विणलेले असते. त्याचे बौद्धिक जीवन हा त्याच्या भौतिक जीवनाचा आविष्कार असतो. भौतिक जीवन म्हणजे उत्पादनशक्तींशी जुळणारी उत्पादनपद्धती, आणि बौद्धिक जीवन म्हणजे मानवाच्या कल्पना, संकल्पना, विचार–त्याचे राज्यशास्त्र, नीतिशास्त्र, वैधिकशास्त्र, तत्त्वज्ञान, वगैरे. माणसाची जाणीव म्हणजे दुसरे तिसरे काही नसून त्याचे भौतिक अस्तित्व, आणि माणसाचे अस्तित्व म्हणजे त्यांची भौतिक जीवन-प्रक्रिया. माणसाच्या जाणिवा त्याचे जीवन ठरवित नाहीत, तर त्याचे जीवन त्याच्या जाणिवा ठरविते. खऱ्याखुऱ्या जिवंत व्यक्ती हे या विचारसरणीचे प्रमेय आहे. हा दृष्टिकोण स्वीकारला तर इतिहास जिवंत होतो, त्याला अर्थ प्राप्त होतो.

एक गोष्ट तावडतोब ध्यानात येईल, की ऐतिहासिक भौतिकवादाच्या या मांडणीत अंतर्विरोधात्मक द्वंद्वाचे तत्त्व अंतर्भूत नाही. अर्थात ते अध्याहृत आहे असे म्हणता येईल. कारण मार्क्स विकासाची भाषा बोलत आहे, आणि मार्क्सचा विकास म्हणजे अंतर्विरोधात्मक विकास हे त्याच्या इतर लिखाणावरून समजते. दुसरी गोष्ट म्हणजे, ज्या परात्मतेवर मार्क्सने इतका भर १८४४ च्या पॅरिस–हस्त–लिखितात दिला, त्याचा संदर्भ येथे दिसत नाही. मार्क्सचे असे मत होते, की मानवाच्या विचारप्रणाली इतकेच नव्हे तर त्याच्या राजकीय वगैरे व्यवस्था परात्मतेने विद्धलेल्या असतात, आणि यामुळेच यांना खोट्या जाणिवांचे स्वरूप प्राप्त होते. या मांडणीत मार्क्सचा सारा भर या रचना आणि विचारप्रणाली यांच्या भौतिक पाया-वरच आहे.

मार्क्सने ही उणीव, यानंतर तेरा वर्षांनी प्रसिद्ध झालेल्या 'द क्रिटिक ऑव्ह पोलिटिकल इकॉनॉमी' च्या प्रस्तावनेत दूर केली. मार्क्सच्या ऐतिहासिक भौतिकवादाच्या अधिकृत आणि निर्णायक समजल्या गेलेल्या या मांडणीत या वादाचे समग्र दर्शन घडते. या प्रस्तावनेत मार्क्स म्हणतो,

"आपल्या जीवनासाठी आवश्यक असलेल्या सामाजिक उत्पादनात माणसे परस्परांशी निश्चित स्वरूपाचे संबंध प्रस्थापित करतात. हे संबंध अत्यावश्यक असतात त्याचप्रमाणे ते त्यांच्या इच्छा-अनिच्छांच्या पलीकडचे असतात– उत्पादनसंबंध की जे त्यांच्या भौतिक उत्पादनशक्तींच्या विशिष्ट अवस्थेशी जुळणारे असतात. या उत्पादन–संबंधांची गोळाबेरीज म्हणजे समाजाची आर्थिक रचना–जी समाजाच्या राजकीय आणि कायदेविषयक इमारतीचा खराखुरा पाया असते, आणि जिच्याशी सामाजिक जाणिवेची निश्चित रूपे (forms) जुळणारी असतात. माणसांच्या भौतिक जीवनाची उत्पादन-पद्धती त्यांच्या सर्वसाधारण सामाजिक, राजकीय, आणि बौद्धिक जीवनप्रक्रियेची परिस्थिती ( condition ) निर्माण करीत असते. माणसांची जाणीव त्यांचे जीवन ठरवीत ( determine ) नाही, तर उलट त्यांचे सामाजिक असतेपण त्यांची जाणीव ठरविते ( determine ). समाजाच्या उत्पादनशक्ती, त्यांच्या विकासाच्या एका विशिष्ट अवस्थेत विद्यमान उत्पादन संबंधांशी संघर्ष पावतात. किंवा हीच गोष्ट कायदेशीर भाषेत मांडायची असेल तर, ज्या स्वामित्व–संबंधांच्या चवकटीत या शक्ती अद्यापपर्यंत आपले कार्य करीत होत्या त्या स्वामित्व-संबंधांशी त्यांचा संघर्ष निर्माण होतो. जे संबंध आजवर उत्पादनशक्तीच्या विकासाची साहाय्यक रूपे होते ते आता याच विकासाच्या पायबेड्या ठरतात. मग सामाजिक क्रांतीचा कालखंड सुरू होतो. आर्थिक पायातील बदलाबरोबर त्याच्यावरील अवघी अमर्याद इमारत कमी अधिक वेगाने परिवर्तन पावते. अशा परिवर्तनांचा विचार करताना, ज्याची निश्चिती निसर्ग-विज्ञानाच्या बारकाव्याने करता

येते अशा उत्पादनाच्या आर्थिक अवस्थांचे परिवर्तन, आणि ज्यांच्या रूपाने माणसांना या संघर्षाची जाणीव होते आणि ज्यांच्या रूपाने ती हा संघर्ष करतात त्या कायदेशीर, राजकीय, धार्मिक, सौंदर्यात्मक आणि तत्त्वज्ञानीय प्रकार–थोडक्यात विचारप्रणालीचे प्रकार–यात नेहमी फरक केला पाहिजे. ज्याप्रमाणे एखाद्या व्यक्तीबद्दलचे आपले मत आपण ती स्वतःला काय समजते यावरून बनवीत नाही त्याप्रमाणे या परिवर्तनकालाबद्दल आपण आपला निर्णय या जाणीवांवरून ठरवू शकत नाही. उलट या जाणिवांचा अर्थ आपण भौतिक जीवनाच्या अंतर्विरोधाच्या आधारे, म्हणजेच सामाजिक उत्पादन शक्ती आणि उत्पादन संबंध यातील विद्यमान संघर्षाच्या आधारे लावला पाहिजे. कोणतीही समाजव्यवस्था, त्या व्यवस्थेतील उत्पादनशक्तींच्या सर्व शक्यता फलद्रूप होईपर्यंत नष्ट होत नाही ; आणि नवे वरच्या अवस्थेतील उत्पादनसंबंध, त्यांना आवश्यक असलेल्या भौतिक अवस्था जुन्या समाजाच्याच गर्भात परिणत होईपर्यंत आविष्कृत होत नाहीत. म्हणून मनुष्यजमात सोडविता येतील असेच प्रश्न स्वतःसमोर उभे करीत असते. कारण, या प्रश्नाचा जरा खोल दृष्टीने विचार केला की ध्यानात येईल, एखाद्या कामाच्या सिद्धतेसाठी आवश्यक असलेली भौतिक परिस्थिती अगोदरच निर्माण झालेली असते, किंवा निदान निर्माण होत असते तेव्हाच ते काम माणसांपुढे उभे राहत असते. साधारणपणे आशियाई, प्राचीन, सरंजामी आणि भांडवली कालखंड समाजाच्या आर्थिक रचनेच्या दृष्टीने प्रागतिक म्हणता येतील. उत्पादनाचे भांडवली संबंध हा, सामाजिक उत्पादनप्रक्रियेचे अखेरचे संघर्षमय रूप होय. म्हणजे वैयक्तिक स्वरूपाचा संघर्ष नव्हे, तर व्यक्तींच्या सामाजिक जीवनातून निर्माण होणारा संघर्ष. त्याचबरोबर, भांडवली समाजाच्या गर्भात निर्माण होणाऱ्या उत्पादन शक्ती, या संघर्षाचे विसर्जन करणारी भौतिक परिस्थती निर्माण करतात. अर्थात ही सामाजिक घडामोड मानवी समाजाचा इतिहासपूर्व काल संपुष्टात आणते."

मार्क्सने या उताऱ्यात आपले सामाजिक अंतर्विरोधात्मक द्वंद्वाचे तत्त्व आणले आहे एवढेच नव्हे, तर ते काय आहे हेही सांगितले आहे. मानवी जीवनाच्या प्रारंभापासून मानवी समाजाचा आणि संस्कृतीचा जो विकास झाला त्याची कळच त्याने या उताऱ्यात सांगितली आहे. ती कळ म्हणजे उत्पादन शक्ती आणि त्यांना जुळतील असे जे उत्पादनसंबंध त्यांच्यात सामाजिक विकासाच्या एका अवस्थेत संघर्ष निर्माण होतो आणि या संघर्षामुळेच विकासाला क्रांतिकारक गती मिळते. याचेच त्याने आणखी एक अंग असे सांगितले आहे, की एखाद्या उत्पादन संबंधाच्या चवकटीत कार्यान्वित असलेल्या उत्पादन शक्तींची अधिकात अधिक वाढ झाल्याखेरीज क्रांती अवतरत नाही. ज्यावेळेला उत्पादन संबंधात उत्पादन शक्तींना अवसर मिळेनासा होऊन ते उत्पादनसंबंध उत्पादनशक्तींच्या विकासाच्या मार्गातले अडसर बनतात त्याच वेळी क्रांतिकालाला सुरुवात होते. म्हणजे क्रांती ही कोणा क्रांतिकारकाच्या डोक्यांतली स्वैर फिरत नव्हे. वास्तव परिस्थितीत क्रांतीला अनुकूल असे फेरबदल होतात तेव्हाच क्रांतीचा संभव निर्माण होतो.

दुसरी गोष्ट मार्क्स सांगतो आहे ती अशी की, उत्पादनसंबंधाच्या गोळाबेरजेने तयार झालेल्या आर्थिक रचनेच्या पायावर समाजाची वैधिक (कायदेशीर) आणि राजकीय इमारत उभी राहते, आणि समाजाच्या धार्मिक–वैचारिक–सांस्कृतिक वगैरे जाणिवा या आर्थिक रचनेशीच जुळत्या मिळत्या असतात. यातली याहूनही महत्त्वाची गोष्ट अशी, की या जाणिवा खोटया असतात, कारण त्या परात्मतेने ग्रासलेल्या असतात. मार्क्सने असे स्वच्छ सांगितलेले नाही; पण उत्पादनाच्या आर्थिक परिस्थितीचे परिवर्तन निसर्गविज्ञानाच्या बारकाव्याने जसे मोजता येते तसे मानवाच्या कायदेशीर, राजकीय, धार्मिक, सौंदर्यात्मक, तत्त्वज्ञानात्मक, थोडक्यात म्हणजे वैचारिक प्रकार मोजता येत नाहीत असे जे तो बजावतो यात ते अध्याहृत आहे; हे तो थोडेसे स्पष्टही करतो. ज्याप्रमाणे एखाद्या व्यक्तीचे स्वतःविषयीचे मत वस्तुस्थितिनिदर्शक मानता येत नाही त्याचप्रमाणे एखाद्या समाजाच्या विचारप्रणाली त्याच्या वास्तव सत्याच्या निदर्शक मानता येत नाहीत. थोडक्यात म्हणजे एखाद्या समाजाच्या बौद्धिक अविष्कारावरून त्याच्या भौतिक वस्तुस्थितीचे निदान करता येत नाही.

मार्क्सच्या या उताऱ्यातले काही विशेष आपण आता नमूद करून ठेवू. पहिली गोष्ट ही, की येथे मार्क्स correspond, condition आणि determine हे शब्द जवळ जवळ एकाच अर्थाने वापरत आहे. प्रथम मार्क्स सांगतो, की उत्पादनसंबंध उत्पादन शक्तींना जुळणारे असतात (correspond) नंतर तो हा correspond शब्द उत्पादन संबंधांची गोळाबेरीज म्हणजे समाजाची आर्थिक रचना हिला सामाजिक जाणिवांची रूपे जुळतात असे सांगताना वापरतो. पुढल्या दोन वाक्यांत हाच आशय व्यक्त करताना तो condition आणि determine असे शब्द वापरतो. पहिल्या वाक्यात तो सांगतो, की समाजाची उत्पादनपद्धती त्याची सामाजिक, राजकीय आणि बौद्धिक जीवनप्रक्रिया condition करतो आणि दुसऱ्या वाक्यात सांगतो माणसांच्या जाणिवा त्याची अस्तित्वता determineकरीत नाही तर त्याची सामाजिक अस्तित्वता (being) त्याच्या जाणिवा ( determine ) करीत असते. Correspond शब्दाचा दुसरा उपयोग आणि हे condition व determine शब्द–निरनिराळ्या अर्थाचे हे तीन शब्द – मार्क्स एकच आशय व्यक्त करण्यासाठी वापरीत आहे.

या उताऱ्यातली दुसरी लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे मार्क्स इतिहासाकडे एक एकसंध प्रक्रिया म्हणून पाहत आहे. हे अर्थात हेगलच्या 'भौतिक' शिष्याला साजेसे आहे. हेगल इतिहासाला एकाच विश्व-चैतन्याचा आविष्कार मानीत असे, तर मार्क्स इतिहासाकडे उत्पादनशक्तींनी निर्माण केलेल्या आणि मग त्यांच्याशी संघर्ष पावणाऱ्या उत्पादनसंबंधाचा – थोडक्यात म्हणजे उत्पादन-पद्धतीचा एकसंध आविष्कार म्हणून पाहतो.

तिसरी गोष्ट म्हणजे उत्पादनशक्ती आणि उत्पादनसंबंध यांतला संघर्ष कायम टिकणारा नसतो. तो फक्त इतिहासपूर्व कालाचे लक्षण असतो. भांडवलशाही ही या इतिहासपूर्व कालातील अखेरची अवस्था. साम्यवादी क्रांतीने भांडवलशाहीची अखेर होईल आणि खऱ्याखुऱ्या इतिहासाला सुरुवात होईल.

आणखी एक लक्षात ठेवायची गोष्ट अशी की, समाजाच्या आर्थिक पायावर जी इमारत उभी राहते तिचे दोन भाग असतात. एक म्हणजे समाजाची वैधिक आणि राजकीय रचना अगर व्यवस्थापन आणि दुसरा भाग म्हणजे, कायदेशास्त्र, राज्यशास्त्र, तत्त्वज्ञान, धर्मशास्त्र, नीतिशास्त्र वगैरे विचार किंवा वैचारिक प्रणाली. मार्क्स Consciousness (जाणीव) असा व्यापक शब्द वापरीत आहे, आणि जाणिवेत प्रतिमा, संकल्पना, भावना, इच्छा या सर्वांचाच समावेश होतो, पण मार्क्सला मुख्यतः मानवाचा संकल्पनात्मक व्यवहार अभिप्रेत आहे असे दिसते. यातही एक सूक्ष्म फरक करायला पाहिजे. मार्क्स या विचारप्रणालीत (ideologies) विज्ञानाचा समावेश करीत नाही. आनुभविक (empirical ) विज्ञान आणि या जाणिवा एक नव्हेत. विज्ञान वस्तुस्थितीचे सत्य दर्शन घडविते, पण या जाणिवा खोट्या असतात, म्हणजे त्या वस्तुस्थितीचे विकृत (distorted) दर्शन घडवितात.

या बाबतीत एक गोष्ट लक्षात बाळगली पाहिजे, की समाजाच्या जाणिवांत भूतकालीन जाणिवांचा अंश असतो. समाजाच्या उत्पादनपद्धतीत भूतकालाचे काही अंश असतातच, त्यामुळे काही भूतकालीन उत्पादनसंबंधही अस्तित्वात असतात. अर्थात त्यांना जुळणाऱ्या काही जाणिवा शिल्लक असणारच. पण समाजाच्या जाणिवांमध्ये भविष्यकालातही झेप असते. ही झेप कोठून उद्भवते ? याचे उत्तर असे देत येईल, की मानव जी भविष्यकालाबद्दल स्वप्ने पाहतो ती त्याच्या जाणिवात उमटतात. पण मार्क्स असे सांगतो, की मानव आपल्यासमोर जी कामे ठेवतो ती उत्पादनपद्धतीच्या विकासाला अनुरूप अशीच असतात. पण प्रत्यक्ष कार्ये आणि स्वप्ने यात आपण फरक करू शकतो. दुसरे असे, की ही भविष्यकालीन स्वप्ने तशी दबूनच राहतात. काही ध्येयवेडे लोक ही स्वप्ने उभवीत असतील, त्यांचा मोठा कल्पनाशाली आविष्कारही करीत असतील, पण मार्क्स 'दि जर्मन आयडिऑलॉजी' मध्ये आणि कम्युनिस्ट मॅनिफेस्टोत सांगतो, की the ruling ideas of an age are the ideas of the ruling class ( कोणत्याही युगाच्या चलत्या कल्पना या चलत्या राज्यकर्त्या

वर्गाच्याच कल्पना असतात.) म्हणून भविष्यकालाची स्वप्ने पाहणाऱ्या कल्पनांनी मार्क्सच्या विधानास बाध येण्याचे कारण नाही.

येथे काही प्रश्नही निर्माण होतात. मार्क्स सामाजिक उत्पादन ( Social production ), भौतिक उत्पादनशक्ती (material productive forces ), उत्पादनसंबंध ( relations of production ), समाजाची आर्थिक रचना ( economic structure of society ), भौतिक जीवनाची उत्पादनपद्धती ( the mode of production of material life ), उत्पादनाची आर्थिक परिस्थिती ( the economic conditions of production ), भौतिक जीवनाचे अंतर्विरोध ( controdictions of material life ), सामाजिक उत्पादनशक्ती ( Social productive forces ) असे अनेक शब्दप्रयोग आणि भाषाप्रयोग करतो. त्याचा अर्थ निश्चित करून घ्यायला हवा. उत्पादनशक्ती म्हणजे ज्या यंत्रे-अवजारे वगैरेंच्या साहाय्याने मनुष्य निसर्गाला काबूत आणतो ती. पण या उत्पादनशक्तींचे वर्णन भौतिक ( material ) असे तो करतो त्याचप्रमाणे सामाजिक ( social ) असेही करतो. तेव्हा उत्पादनसाधनात ती वापरणाऱ्या माणसाचाही समावेश करायचा काय? उत्पादनसंबंध म्हणजे मालक-मजूर, सरंजाम-भूदास यांच्यासारखे संबंध. पण मार्क्स भौतिक जीवनाची उत्पादनपद्धती ( the mode of production of material life) असे म्हणतो तेव्हा नक्की काय समजायचे? उत्पादनशक्ती की उत्पादनसंबंध की दोघांचा गुणाकार? आर्थिक रचना म्हणजे उत्पादनसंबंधांची गोळाबेरीज असे मार्क्स सांगतो. मग उत्पादनाची आर्थिक परिस्थिती ( the economic conditions of production ) या भाषाप्रयोगाने काय समजायचे ? भौतिक ( material ) याचा तरी अर्थ काय करायचा ? केवळ अनाध्यात्मिक अगर अ-बौद्धिक की तत्त्वज्ञानात्मक ? भौतिक उत्पादनशक्ती आणि सामाजिक उत्पादनशक्ती यात नक्की फरक काय ? कम्युनिस्ट मॅनिफेस्टोत निसर्गाला मानवाच्या दावणीला बांधण्याचा उल्लेख आहे. भांडवलशाहीतील उत्पादनशक्तींचा उल्लेख करताना, यंत्रे, रसायनशास्त्राचा उपयोग, रेल्वे, टेलिग्राफ, वाफेवर चालणाऱ्या बोटी वगैरेंचा उल्लेख आहे. तेव्हा ' उत्पादनशक्ती ' या शब्दप्रयोगाने मार्क्सच्या मनात यंत्रतंत्रविज्ञानाचा उपयोग असावा असे वाटते. पण भौतिक उत्पादनशक्ती आणि सामाजिक उत्पादनशक्ती यांमध्ये नेमका फरक काय ? पहिल्याकडे यंत्रतंत्रज्ञानाकडे पाह्यचे आणि दुसऱ्याकडे उत्पादनसंबंधांच्या दृष्टीने पाह्यचे-असा काय ?

The Illusion of an Epoch ( एका कालखंडाचा भ्रम ) या पुस्तकात एच्. बी. ॲक्टन यांनी या संदर्भात फार उपयुक्त विवेचन केले आहे. ते म्हणतात, की मार्क्सवाद्यांच्या मते उत्पादन संबंधांच्या पाच पातळ्या उत्पादनशक्तींच्या पाच पातळ्यांशी संलग्न आहेत. त्या अशा : पहिली पातळी अश्मयुगाची. या युगातील अश्मसाधनांशी ( दगडी हत्यारांशी ) प्राचीन साम्यवादाचा ( primitive communism) संयोग झालेला असतो. धातूची ( लोखंडाची ) हत्यारे उपलब्ध झाली तेव्हा गुलामगिरीचे युग अवतरले. मार्क्सने ( आपल्या, 'तत्त्वज्ञानाचे दारिद्र्य' या पुस्तकात) हातचक्कीची सांगड सरंजामशाहीशी घातली आहे. वाफेच्या वगैरे शक्तींनी चालणाऱ्या यंत्रावर औद्योगिक भांडवलशाहीची उभारणी झाली. आणि या वाफ-वीज वगैरे शक्तींचा आधुनिक विज्ञानाच्या उपयोजनाने पूर्ण विकास झाला की कम्युनिझम (साम्यवादाचा) उदय होईल. या पाच पातळ्यांचा विचार केला, की उत्पादनशक्ती म्हणजे मुख्यतः यंत्रतंत्रविज्ञान ( technology ) किंवा तांत्रिक विद्या असे वाटते. 'भांडवल-१' मध्ये एके ठिकाणी मार्क्सने असे म्हटलेही आहे.

पण एवढ्याने भागत नाही. उत्पादनशक्ती आणि उत्पादनसंबंध यांचे जे पक्के नाते येथे घालून देण्यात आलेले आहे ते निर्विवाद आहे का, असा प्रश्न विचारता येईल. पण येथे आपल्याला मार्क्सच्या उताऱ्याचे मर्म समजावून घ्यायचे आहे. त्या दृष्टीने एच्. बी. ॲक्टन यांनी उत्पादनशक्ती आणि उत्पादनसंबंध यांच्या नात्याचे जे तीन वर्ग कल्पिले आहेत ते ध्यानात घ्यायला हवेत. ॲक्टन अर्थात रॉबिन्सन क्रूसोंचा येथे विचार करीत नाही. समाजात रॉबि-


अनुक्रमणिका

न्सन क्रूसो नसतातच. माणूस हा तसा पक्का सामाजिक प्राणी आहे. तो समाजात जन्मतो, समजात जगतो, समाजात वाढतो. एकच एक कोळी आहे, त्याच्यापाशी एक होडके आहे, एकट्याने तो ते वल्हवतो, मासे पकडतो व एकट्याने त्याच्यावर गुजराण करतो असे सहसा घडत नाही. त्याने होडके आणले कोठून, नुसत्या माशाने त्याचे कसे भागते व चालते, आणि त्याला वस्त्रनिवारा वगैरे गोष्टी लागतात की नाही, असे प्रश्न उत्पन्न होतातच. हे प्रश्न इतके प्राथमिक आहेत की ते उत्पन्न करण्याची गरजच ॲक्टनना वाटलेली नाही.

ॲक्टननी कल्पिलेला पहिला वर्ग असा आहे, की ज्यात उत्पादनशक्तीच्या कार्यवाहीतच उत्पादनसंबंध अनुस्यूत असतो. उदाहरणार्थ आपण जर जहाज ही उत्पादनशक्ती घेतली तर ते चालविण्यातच एखादा प्रमुख (कॅप्टन), दिग्दर्शक, वल्ही मारणारा, शिडे सांभाळणारा, खाण्यापिण्याची व्यवस्था करणारा असे उत्पादनसंबंध निर्माण होतात. हे उत्पादनसंबंध उत्पादनशक्तीपासून वेगळे काढता येतच नाहीत. मार्क्सने वरील उताऱ्यात उत्पादनसंबंधांची सांगड मालकी हक्कांशी घातली आहे. पण येथे मालकी हक्काचा प्रश्न फजूल ठरतो. असे असू शकेल की या जहाजावर काम करणारे सगळेच लोक या जहाजाचे मालक असतील, किंवा ते सारेच नोकर असतील, किंवा त्यातला एक जण मालक असेल. उत्पादनसंबंध कसेही असले तरी जहाजावर काम करणाऱ्यात वरील भेद पडणारच. यांना उत्पादनसंबंध म्हणायचे की उत्पादनशक्तीचेच ते भाग मानायचे हे सांगणे कठीण आहे. ॲक्टननी दिलेले दुसरे उदाहरण शेतीचे आहे. एखादा मनुष्य हातात फावडे घेऊन जमीन कसायला येतो तेव्हा तो एकटा दिसला तरी एकटा नसतो. आपण जे धान्य पिकवू ते कोणी उध्वस्त करणार नाही. साधारणपणे त्याच्यावर कोणी डल्ला मारणार नाही, आणि अखेरीस त्याला आपले पीक निर्विवादपणे कापून नेता येईल, अशी शाश्वती असल्याशिवाय तो जमीन कसायला येणारच नाही. ही शाश्वती हा त्याच्या उत्पादन कार्याचाच भाग म्हटला पाहिजे. म्हणजे त्याच्या शेत पिकविण्यात एक प्रकारचा कायदा, एक प्रकारची रूढी, काही सामाजिक संबंधाची व्यवस्था गृहीतच असते. नांगर किंवा फावडे एवढीच त्याची उत्पादनशक्ती, पण ती चालू होण्याच्या या अटीच असतात. आता कायदा, रूढी, सामाजिक रीती या गोष्टी, मार्क्सच्या, मते आर्थिक पायावर उभ्या असलेल्या समाजाचे सामाजिक– वैचारिक– वैधिक वगैरे भाग असतात. म्हणजे येथे 'आधी कळस मग पायारे' अशी परिस्थिती उद्भवते. ॲक्टननी सांगितलेला तिसरा प्रकार म्हणजे जेथे उत्पादन बाजारात विकण्यासाठी निर्माण करण्यात येते तो. आता हे उत्पादन म्हणजे खरेखुरे आर्थिक उत्पादन. मार्क्सच्या सिद्धांताप्रमाणे या उत्पादनात नवे संशोधन, नव्या शक्ती उपलब्ध झाल्या तर माल स्वस्त होईल आणि बाजारावरचा त्याचा प्रभाव वाढेल. पण हेही खरे, की कोणता माल खपेल, कोणत्या मालाची गरज जाहिरातीने वगैरे निर्माण करता येईल, कोणत्या मालाची कृत्रिम टंचाई वगैरे निर्माण करता येईल या 'बाजारी' हिशेबाने मालाचे उत्पादन होऊ शकते. त्यासाठी नव्या उत्पादनशक्ती निर्माण केल्या जातात. म्हणजेच व्यापारी हिशेब उत्पादनशक्तीच्या निर्मितीत कार्यान्वित होतो. मार्क्स वरील उताऱ्यात 'सामाजिक उत्पादनशक्ती' असा भाषाप्रयोग करतो. त्याचा अर्थ या अनुरोधाने लावायचा काय ? आणि तसा तो लावला तर मार्क्सच्या सिद्धांताचा रोख बदलेल की नाही ?

हे झाले पायाबद्दलचे प्रश्न. वरच्या इमारतीबद्दलही असेच अनेक प्रश्न उद्भवतात. पाया (समाजाची आर्थिक रचना) आणि वरची इमारत (राजकीय, धार्मिक वगैरे संस्था व त्यांचा व्यवहार आणि त्यांच्याबद्दलचा विचार) यांच्यामध्ये नक्की संबंध काय ? आपण एखाद्या इमारतीचा पाया घालतो तेव्हा ज्या प्रकारची इमारत आपल्याला हवी असेल तिला पक्का आधार देईल असा पाया घालतो; इमारतीची लांबी-रुंदी, उंची आणि तिचे अंतर्विभाग, त्याचप्रमाणे इमारतीचे वजन वगैरे गोष्टी ध्यानात घेऊन पाया रचतो. म्हणजे पाया इमारतीने ठरतो. येथे उलट दिसते. उत्पादनशक्तींनी त्यांना जुळणारे असे उत्पादनसंबंध निर्माण होतात आणि त्यांच्या पायावर राजकीय–बौद्धिक वगैरे इमारत उभी राहते.

अनुक्रमणिका

'द जर्मन आयडिऑलॉजी' मध्ये मार्क्स सांगतो की, माणसांचे बौद्धिक जीवन हा त्यांच्या भौतिक वर्तनाचा सरळ स्राव (direct efflux), साक्षात स्राव असतो. आता प्रश्न असा, की भौतिक वर्तन (material behaviour) म्हणजे काय? आणि सरळ स्राव किंवा साक्षात आविष्कार (direct efflux) म्हणजे तरी काय?

उत्पादनसंबंधांनी तयार झालेली आर्थिक रचना हा पाया. याचा विचार आपण थोडासा केला आहे. पण या पायावर जी इमारत उभी राहते असे मार्क्स म्हणतो तिचे स्वरूप नक्की काय आहे? "सामाजिक, राजकीय आणि बौद्धिक जीवन-प्रक्रिया" (Social, political and intellectual life process) असे तिचे वर्णन मार्क्स करतो. "वैधिक आणि राजकीय इमारत" (legal and political superstructure) असेही तो म्हणतो आणि त्याला "सामाजिक जाणिवेची रूपे" (forms of social consciousness) असा प्रयोग जोडून देतो. "वैधिक, राजकीय, धार्मिक, सौंदर्यात्मक किंवा तत्त्वज्ञानात्मक-थोडक्यात विचारप्रणालीची रूपे" (legal, political, religious, aesthetic or philosophic -in short ideological forms) – "ज्या विचारप्रणालींनी माणसांना उत्पादनशक्ती–वि० –उत्पादनशक्ती या संघर्षाची जाणीव होते आणि ज्यांच्या साहाय्याने ती हे संघर्ष लढतात" (in which men become conscious of this conflict and fight it out) असेही वर्णन तो करतो. मार्क्सच्या या वर्णनाकडे थोडे काळजीपूर्वक पाहिले, की या जीवनप्रक्रियेचे, या इमारतीचे दोन भाग तो कल्पितो असे ध्यानात येते. एक म्हणजे वैधिक, राजकीय, धार्मिक वगैरे व्यवस्थापन किंवा व्यवहारयंत्रणा, आणि दुसरा म्हणजे या व्यवहाराविषयीचा विचार. उदाहरणार्थ कायद्यासंबंधीची यंत्रणा ध्यानात घेतली तर राजसत्तेने पसार केलेले कायदे, त्यांची अंमलबजावणी करणारे पोलिस खाते, त्यांच्या संदर्भात निवाडा करणारे न्यायखाते यांचा या यंत्रणेत समावेश होतो. राजसत्तेत, सरकार, कायदेमंडळ, न्यायखाते, नोकरशाही वगैरे यंत्रणेचा समावेश होतो. आणि धार्मिक यंत्रणेत, धर्मविषयक आचार व त्यांचे नियंत्रण करणारे धर्मगुरू यांचा समावेश होतो. याच बरोबर शैक्षणिक-सांस्कृतिक संस्था, व्यापारी-उद्योगपतींच्या संस्था वगैरेंचाही उल्लेख करायला हवा. इमारतीचा हा एक भाग. दुसरा भाग म्हणजे या साऱ्यांबद्दल प्रचलित असलेला विचार. यात राजकीय, धार्मिक, सौंदर्यात्मक तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र, समाजशास्त्र वगैरेंचा विचार केला पाहिजे.

आता प्रश्न असा, की आर्थिक पायावर ही व्यवहारयंत्रणा कशी उभी राहते? आणि आर्थिक पायावर विचार कसा उद्भवतो? ज्याच्या हातात समाजाची आर्थिक रचना असते तेच तिच्यावर राजकीय, धार्मिक वगैरे यंत्रणा उभारतात का? प्रथम ही यंत्रणा अस्तित्वात येते आणि मग तिला अनुरूप असा विचार उद्भवतो? की अगोदर विचार आणि त्यानुसार व्यवहारयंत्रणा निर्माण होते?

पण याहून महत्त्वाचा प्रश्न म्हणजे इमारत आणि पाया यांचे येथे नक्की नाते काय? जॉन प्लामेनात्स यांनी थोडे खोलात जाऊन विचारले आहे की, इमारतीतला व्यवहार करताना जी भाषा वापरली जाते ती भाषा आर्थिक पायावरील भाषेतून काढलेली असते काय? की आर्थिक पायावर ज्या गरजा निर्माण होतात त्यांना तोंड देता देता ही भाषा आणि त्यात ग्रथित झालेल्या कल्पना उदयास येतात? प्लोमेनात्सचा धागा धरून आपण असे विचारू शकतो की आर्थिक जीवनात शिस्तीची गरज असते. या आर्थिक शिस्तीच्या गरजेतून नैतिक शिस्तीच्या कल्पना जन्मल्या काय? आर्थिक जीवन यशस्वी करण्यासाठी सचोटी आणि खरेपणा यांची गरज असते. नैतिक सचोटी आणि सत्याचे महत्त्व यांचा जन्म यातून झाला काय? भांडवलशाहीत, विशेषत: स्पर्धेच्या वादळात सापडलेल्या भांडवलशाहीत एक प्रकारची असुरक्षिततेची भावना दाटते. या संदर्भात अभय देण्यासाठी धर्म उद्भवतो किंवा वाढतो काय? आर्थिक जीवन जगताना सहकार्याची आवश्यकता असते. बंधुतेची कल्पना यातून जन्मली काय? आर्थिक जीवनात स्वतःच्या श्रमाचा योग्य मोबदला मिळण्याची आस लागते. यातून खाजगी मालकीची कल्पना उदयास आली काय? आर्थिक

जीवनात स्पर्धा महत्वाची ठरते. क्रीडाक्षेत्रातल्या स्पर्धेचा शोध येथे घ्यायचा काय ? राजकारणात प्रत्येक व्यक्तीला तिची किंमत असते असे म्हणतात, या वचनाचा उगम आर्थिक किंमतींच्या बाजारात शोधायचा काय ? आर्थिक व्यवहारात अनेक गोष्टींचे रहस्य जाणून घ्यावे लागते; व्यक्ती आणि वस्तू यांचा स्वभाव जाणून घ्यावा लागतो. यातूनच विज्ञानाची उत्पत्ती झाली काय ? माणसाला त्याचे आर्थिक जीवन असते, तसे कौटुंबिक जीवन असते, स्नेह-जीवन असते, क्लब-जीवन असते. येथे महत्त्वाच्या ठरणाऱ्या प्रेम, स्नेह, सहकार्य वगैरे कल्पनांचे मूळ आर्थिक जीवनात शोधायचे काय ?

या कल्पना म्हणजे आर्थिक जीवनाचा सरळ स्राव ? आता प्रश्न असा की या कल्पना या जीवनाची प्रतिबिंबे (reflections) असतात, की प्रतिक्षेप (reflexes) असतात, की परिणाम (result) असतात की प्रतीके (symbols) असतात ? प्रतिबिंब असेल तर पाया आणि इमारत यांत फरक पडण्याचे कारण नाही. राजकीय स्पर्धा आर्थिक स्पर्धेबरहुकूम चालणारी असेल. वाङ्मय म्हणजे पाहायचे नि लिहायचे या स्वरूपाचे सरळ-सरळ चित्रण असेल. परमेश्वराकडे आपण मोक्षापेक्षा ऐहिक उत्कर्षाची अधिक आक्रंदून मागणी करू. ती प्रतिक्षेप असेल तर त्यात बुद्धीचे कार्य कमीत कमी असेल, कल्पनाशक्तीला वावच नसेल. परिणाम हा प्रतिक्षेपाच्या मानाने फारच आडवळणाचा असेल. आणि प्रतीक शब्द वापरला, की आणखीच प्रश्न उपस्थित होतात. प्रतीक ( Symbol ) आणि चिन्ह ( Sign ) यात फरक करावा लागेल. मुख-कमल ही प्रतीकात्मक कल्पना मुळात कोणा तरी व्यक्तीच्या वैयक्तिक प्रत्ययाची असते तर धूर तेथे अग्नी ही चिन्हात्मक कल्पना सार्वत्रिक अनुभवाची असते. आता या कल्पना प्रथम कोणाच्या तरी डोक्यात प्रतीके म्हणून उद्भूत होऊन नंतर त्यांना सार्वत्रिक चिन्हात्मकता प्राप्त होते असे म्हणायचे का ?

आता यापुढचा अधिक महत्त्वाचा प्रश्न म्हणजे या इमारतीला आधारभूत असलेल्या जाणिवा खोटचा असतात– त्या ideologies असतात– असे मार्क्स म्हणतो. Ideology म्हणजे काय ? याचे एक सुंदर उदाहरण मार्क्सने आपल्या 'एटिन्थ ब्रूमेर ऑव्ह लुइ बोनापार्ट' या पुस्तकात दिले आहे. तो म्हणाला की फ्रेंच भांडवलवाले जेव्हा 'स्वातंत्र्य, समता आणि बंधुता' यांचा उद्घोष करीत असतात त्यावेळी ते खरोखर आपल्या संपत्तीच्या संरक्षणार्थ घोडदळ, पायदळ आणि तोफदळ यांचा विचार करीत असतात. येथे स्वातंत्र्य, समता आणि बंधुता यांमागील जाणिवा कशा खोटचा आहेत याचे उत्कृष्ट दर्शन घडते. वर उद्धृत केलेल्या उताऱ्यात मार्क्सने हे फक्त सुचविले आहे. तो म्हणतो की, उत्पादनाच्या आर्थिक स्थितीचा अभ्यास जसा निसर्गविज्ञानाच्या सूक्ष्मतेने करता येतो तसा राजकीय, धार्मिक, तत्त्वज्ञानात्मक ( म्हणजे थोडक्यात 'आयडिऑलॉजिकल' ) प्रकारांचा करता येत नाही. कारण त्या खोटचा असतात. खोटचा जाणिवेचे (false consciousness चे ) ते नमुने असतात. या जाणिवा खोटचा का असतात ? कारण माणसे जे जीवन जगत असतात ते परात्मतेने ग्रासलेले असते. परात्मतेमुळे माणसे वस्तुस्थितीकडे सरळ उघडचा डोळचांनी पाहू शकत नाहीत. परात्मतेमुळे एक प्रकारचे हर-वलेपण, एक प्रकारचे वैफल्य, एक प्रकारची परि-त्यक्त अवस्था माणसाच्या वाटचास कशी येते याचा अभ्यास आपण केलेला आहे. अशा वैफल्यग्रस्त मनास भावणाऱ्या जाणिवा उलटचासुलटचा विकृत स्वरूपाच्या व्हाव्यात हे क्रमप्राप्तच आहे.

आणखी एक प्रश्न. मार्क्स या उताऱ्यात आर्थिक परिस्थितीचा अभ्यास निसर्गविज्ञानाच्या नेमकेपणाने करता येतो, पण विचारप्रणालीं ( ideologies ) चा तसा करता येत नाही असे म्हणतो. आता प्रश्न असा, की मार्क्सवाद हे विज्ञान आहे की खोटचा जाणिवांवर आधारलेली विचारप्रणाली आहे ? निसर्गाप्रमाणे आर्थिक व्यव-हाराचा अगर व्यवस्थापनाचा अभ्यास विज्ञानाच्या शिस्तीने करता येतो का, हाच एक प्रश्न आहे. पण मार्क्स म्हणतो म्हणून आपण ते मानले तरी मार्क्सवाद म्हणजे काही आर्थिक व्यवहार नव्हे. तो एक वैचारिक प्रतिबिंब किंवा प्रतिक्षेप अथवा प्रतीकच आहे. आर्थिक रचनेचा वैज्ञानिक अभ्यास कदाचित शक्य होईल, पण अर्थशास्त्र हे विज्ञान ठरेल का ? समाजशास्त्र हे विज्ञान ठरेल का ? ही

शास्त्रे मानवाचे केवळ भौतिक जीवनच अभ्यासतात असे नाही. त्यांचे आत्मिक जीवनही या अभ्यासास सुरगाठी-निरगाठी मारते. त्यांच्या वैचारिक प्रतिक्रियांचाही वेध घ्यावा लागतो. इतकेच काय पण हे सारे समाजाच्या रूढी, समजुती, संकेत, नीतिनियम, आणि प्रत्यक्ष व्यवहार यांच्या पार्श्वभूमीवर करावे लागते. हे मार्क्सवादाला लागू आहे की नाही ? मार्क्सवाद हे एक विज्ञान आहे की समाजशास्त्र आहे की तत्त्वज्ञान आहे ?

या प्रश्नांची उत्तरे देण्याचा उत्तम मार्ग म्हणजे इमारतीचे काही भाग घेऊन मार्क्सवादाच्या प्रकाशात त्यांचा शोध घेणे, त्यांचे स्वरूप न्याहाळणे, मार्क्सच्या सिद्धान्ताच्या आधारे त्यांच्यावर काही विशेष प्रकाश पडतो का पाहणे, मुख्य म्हणजे त्यांचे स्वरूप कळते का याचा तलास लावणे.

असे सहज सुचणारे भाग म्हणजे धर्म, नीती आणि राजसत्ता ( state )– त्यांचा व्यवहार आणि त्यांच्याविषयीचा विचार. मार्क्सवादाच्या प्रकाशात हे कसे दिसतात ?

प्रथमच जाणवते ते असे, की मार्क्सने धर्म, नीती आणि राजसत्ता यांच्यावर व्यवस्थित साधकबाधक असे लिहिलेले नाही. त्याने प्रसंगोपात्त, इतर प्रश्नांवर लिहिताना, या विषयांसंबंधी फुटकळ उद्गार काढले आहेत आणि ते ध्यानात घेऊनच त्याचा ऐतिहासिक भौतिकवाद या प्रश्नावर किती प्रकाश पाडतो यांचा अंदाज घेणे भाग आहे.

प्रथम धर्माचा विचार करू या. आपल्या १८४४ च्या ' इण्ट्रोडक्शन टु द क्रिटीक ऑव्ह हेगल्स फिलॉसॉफी ऑव्ह राइट ' या लेखात तो लिहितो :

"धर्मविरोधी टीकेचा पाया हा मानवधर्म निर्माण करतो, धर्म मानवाला निर्मीत नाही. दुसऱ्या शब्दांत हेच म्हणायचे तर, ज्या माणसाला अद्याप स्वतःचा शोध लागलेला नाही किंवा जो स्वतःला पुनरपि हरवून बसलेला आहे अशा मानवाची धर्म ही आत्मजाणीव किंवा आत्मभाव असतो. पण मानव हा कोणी जगाच्या बाहेर बैठक मारून बसलेली अमूर्त अस्तित्वता नाही. माणूस म्हणजे **माणसाचे जग**, राजसत्ता, समाज. ही राजसत्ता किंवा हा समाज धर्माची निर्मिती करतो. हा धर्म म्हणजे जगाविषयीची तिरपागडी जाणीव, कारण ही राजसत्ता–समाज हेच एक तिरपागडे बनलेले जग असते......धर्मविरोधी लढा हा म्हणूनच या दुसऱ्या विरुद्ध लढ्याचा एक अप्रत्यक्ष प्रकार असतो. धर्म हा याच जगाचा एक आध्यात्मिक सुगंध असतो. **धर्माचे रूप घेतलेली दुर्दशा** ही त्याच वेळी खऱ्या जीवनातील दुर्दशेचा आविष्कार असते, आणि दुर्दशेविरुद्ध व्यक्त झालेला **निषेधही** असतो. धर्म हा दलित संस्कृतीचा उसासा असतो. तो ज्याप्रमाणे चैतन्यहीन अवस्थेचे चैतन्य असतो त्याप्रमाणे हृदयशून्य जगाचे अंतःकरण असतो. धर्म म्हणजे लोकांसाठी अफूची गोळी."

पुढे १८४६ च्या 'द जर्मन आयडिऑलॉजी'मध्ये मार्क्सने निसर्गपूजनाच्या अवस्थेतील धर्माची उत्पत्ती सांगितली आहे. तो म्हणतो :

"प्रारंभी जाणीव असते ती लगतच्या संवेदनात्मक सभोवतालची आणि इतर जणांशी स्वतःबाहेरील वस्तूंशी असलेल्या मर्यादित संबंधांची. ही स्वतःबद्दल जाणीव होत असलेली जाणीव असते. त्याचबरोबर ती निसर्गाविषयीची जाणीव असते– ज्या निसर्गाची, काही तरी अगदी परकीय, सर्वसमर्थ आणि अनाक्रमणीय शक्ती म्हणून मानवाशी समक्षता झडत असते; ज्या निसर्गाकडे पाहण्याची मानवाची दृष्टी अगदी पशुवत् असते आणि ज्याला तो पशूप्रमाणेच शरण जातो. अर्थात निसर्गाची ही शुद्ध पशु–जाणीव असते (निसर्गपूजन). हे निसर्गपूजन किंवा निसर्गाकडे पाहण्याची ही विशिष्ट दृष्टी समाजाच्या स्वरूपाने ( किंवा उलट) ठरविलेली असते, हे लगेच उघड होईल. इतरत्रप्रमाणे येथेही मनुष्य आणि निसर्ग यांची एकात्मता इतकी स्पष्ट आहे, की मानवांची निसर्गाकडे पाहण्याची मर्यादित दृष्टी त्यांची एकमेकांकडे पाहण्याच्या मर्यादित दृष्टीची पूर्वावस्था निर्माण करते (conditions) तर एकमेकाकडे पाहण्याची त्यांची मर्यादित दृष्टी निसर्गाकडे पाहण्याची त्यांची दृष्टी ठरविते (determines )– एवढ्याच कारणासाठी, की इतिहासाने निसर्गावर अद्याप फारसे संस्कार केलेलेच नसतात. दुसऱ्या बाजूने, सभोवतालच्या व्यक्तींशी दळणवळण करण्याच्या आवश्यकतेची जाणीव ही समाजात राहण्याच्या जाणिवेची सुरुवात असते. ही सुरुवात या अवस्थेत सामाजिक जीवन जितके पशवत् असते तितकी पशुवत् असते. ती फक्त कळप– जाणीव

असते, आणि मेंढरे आणि माणूस यांत एवढाच फरक असतो, की त्याची जाणीव सहजप्रेरणेची जागा घेत असते किंवा त्याला आपल्या सहजप्रेरणांची जाणीव होत असते."

यानंतरचा धर्माविषयीचा महत्त्वाचा उल्लेख मार्क्सच्या 'भांडवल–१' (१८६७) या ग्रंथात आढळतो. तेथे तो म्हणतो, "धार्मिक जग हे खऱ्या-खुऱ्या जगाचा प्रतिक्षेप किंवा प्रतिरूप असते. क्रयवस्तूंच्या उत्पादनावर आधारलेल्या जगाच्या दृष्टीने ख्रिस्तधर्म, विशेषतः त्याच्या भांडवली विकासावस्थेतील जगाच्या दृष्टीने प्रॉटेस्टंट पंथ किंवा केवलेश्वरवादी पंथ, हा धर्माचा अतिशय अनुरूप असा प्रकार असतो. प्राचीन आशिआई व इतर प्राचीन उत्पादनपद्धतींमध्ये, उत्पादनाचे क्रयवस्तूंत, म्हणजे माणसाचे क्रयवस्तूंच्या उत्पादकांत, होणारे रूपांतर अगदी कमी प्रमाणात असते. पण या प्राचीन समाजव्यवस्था विसर्जन पावण्याकडे झुकतात तसतसे क्रयवस्तूंच्या उत्पादनाचे आणि उत्पादकांचे महत्त्व वाढत जाते. खरोखर ज्यांना व्यापारी राष्ट्रे म्हणता येईल अशी राष्ट्रे प्राचीन जगाच्या सांदीकोपऱ्यातच आढळतात. भांडवली समाजाच्या तुलनेने उत्पादनाच्या त्या प्राचीन समाज-व्यवस्था अगदी साध्या आणि पारदर्शक असतात. पण त्या, प्राचीन आदिवासी जमातीतील बांधवांशी जोडणारा ज्याची नाळ अद्याप कापलेली नाही अशा व्यक्तीच्या अपरिपक्व विकासावर आधार-लेल्या असतात, अथवा साक्षात परवशतेच्या संबंधां-वर आधारलेल्या असतात. मानवाच्या श्रमाची उत्पादकता जेव्हा विकासाच्या अगदी खालच्या अवस्थेत असेल, आणि म्हणून भौतिक जीवनातले– माणसामाणसातले आणि मानव-निसर्गातले– सामा-जिक संबंध जेव्हा अगदी संकुचित असतात तेव्हाच अशा समाजव्यवस्था उद्भवतात आणि अस्तित्वात राहतात. हा संकुचितपणा प्राचीन निसर्गपूजनात आणि त्यावेळच्या आदिवासी धर्मांच्या इतर विशे-षांत प्रतिबिंबित होतो. ज्यावेळी दैनंदिन जीवनाचे संबंध मानवाला, इतर मानव आणि निसर्ग यांच्याशी असलेल्या संबंधांच्या संदर्भात पूर्णपणे बुद्धिगम्य आणि विवेकपूर्ण होतील, त्याच वेळी खऱ्या जगाचा प्रतिबिंबरूप प्रतिक्षेप असलेला धर्म अखेरीस नाहीसा होईल".

यांपैकी पहिल्या १८४४ च्या उताऱ्यात मार्क्सच्या सिद्धांताची मांडणी आढळेल तर दुसऱ्या ढोहोत इतिहासात धर्माच्या उत्पत्तीपासून त्याच्या अखेरच्या विसर्जनापर्यंतच्या काही कालखंडातील धर्माच्या स्थितीचा विचार आहे. पहिल्या उताऱ्यात माणूसच धर्माला निर्मितो– पण माणूस कसा, तर स्वत्व हरविलेला माणूस, असे मार्क्स म्हणतो. म्हणजे येथे धर्माचा संबंध परात्मतेशी जोडलेला आहे. धर्म ही एक खोटी उफराटी जाणीव आहे आणि ती उफराटचा जगातून निर्माण झालेली आहे. धर्माच्या रूपाने माणसाच्या दुःखाचे आणि दैन्याचे दर्शन घडते, कारण या दुःखदैन्याचा विसर पडण्या-साठीच धर्माचा उपयोग होतो. म्हणूनच मार्क्स म्हणतो, की धर्म ही अफूची गोळी आहे. येथे माणसाच्या भौतिक जीवनाचा उल्लेख नाही. तो पुढच्या १८४६ च्या उताऱ्यात आहे. येथे मार्क्स मानवाच्या अगदी प्रारंभीच्या जाणिवांबद्दल किंवा संज्ञेबद्दल बोलत आहे. मानवी संज्ञेच्या या प्रारंभिक अवस्थेतच मानवाच्या अतिप्राचीन धर्माचा म्हणजे निसर्गपूजेचा उगम झाला. पण याचे जे भौतिक-ऐति-हासिक विश्लेषण मार्क्स करतो ते, या सिद्धांताच्या दृष्टीने, जरा निरखण्यासारखे आहे. मार्क्स म्हणतो, की या प्रारंभिक कालात मानवाची निसर्गाकडे पाह-ण्याची जी मर्यादित दृष्टी असते तिच्यामुळे त्याची इतर मानवांकडे पाहण्याची मर्यादित दृष्टी निर्माण होते आणि इतरांकडे पाहण्याची त्याची जी मर्या-दित दृष्टी असते त्यामुळे त्याची निसर्गाकडे पाह-ण्याची मर्यादित दृष्टी ठरते. मानवाची उत्पादन-पद्धती आणि त्याचे सामाजिक बौद्धिक जीवन यांतील परस्पर-संबंधाच्या विकसित दृष्टीने या विधानाकडे पाहिले तर काय आढळते ? माणसाची जी उत्पादन-शक्ती असते त्यात त्याचा निसर्गाशी असलेला संबंध अनुस्यूत असतोच. म्हणजे येथे मार्क्स मानवाचे भौतिक जीवन आणि त्याचे बौद्धिक जीवन यांचा पर-स्पर परिणाम सुचवीत आहे. म्हणजे भौतिक जीवन आणि बौद्धिक जीवन यांच्याकडे एकदिश (one-way) दृष्टीने पाहून चालणार नाही. याची एक जाणीव मार्क्सच्या मनात कोठेतरी तरळत होती असे



अनुक्रमणिका

दिसते. पण मार्क्सच्या नंतरच्या (भांडवल–१ मधल्या) उताऱ्यात आपल्याला धर्माचे जे विवेचन आढळते ते मार्क्सच्या 'ऐतिहासिक भौतिकवादा'च्या परिचित भूमिकेलाच धरून आहे. त्यातले पहिलेच वाक्य पुकारते की 'धार्मिक जग हे खऱ्याखुऱ्या जगाचा प्रतिक्षेप (reflex) आहे.' (आता येथे reflex याचा अर्थ काय करायचा हा एक प्रश्नच आहे. ऑक्स्फर्डच्या शब्दकोशाप्रमाणे याचा एक अर्थ 'आरशातील प्रतिबिंब' असा आहे तर आणखी एक प्रतिक्षेप असा आहे. प्रतिक्षेपमध्ये आपोआपपणा सूचित असतो. Reflex चा अर्थ प्रतिबिंब (reflection) असा घेतला तर बौद्धिक–सामाजिक जीवन हे आर्थिक–भौतिक जीवनाची जशीच्या तशी नक्कल ठरेल. आणि तशी ती मार्क्सला अभिप्रेत नसावी. खरोखर reflex याचा अर्थ काय करायचा हा एक प्रश्नच आहे– आणि मार्क्सच्या सिद्धांत–विचारातली ही एक डोकेदुखी ठरली आहे.) मार्क्स या उताऱ्यात पुढे सांगतो की मनुष्यसमाज जेव्हा क्रयवस्तूच्या उत्पादनास जरा जोराने लागला तेव्हा ख्रिश्चन धर्माचा उदय झाला. त्यापूर्वीच्या समाजात जेव्हा क्रयवस्तूंचे (commodities) उत्पादन अगदी अल्पप्रमाणात होते त्यावेळी माणसांचा वैयक्तिक विकास अगदी परिमित होता. व्यक्तीची समाजाशी जोडलेली नाळ अद्याप कापलेली नव्हती; किंवा तिचे संबंध साक्षात परवशतेचे होते. या दोन (प्राचीन आदिवासी किंवा गुलामगिरी) समाजात निसर्गपूजा अगर तत्सम प्राथमिक धर्म प्रचलित होते. याच उताऱ्यात मार्क्स शेवटी सांगतो, की धर्माचे अखेरचे विसर्जन केव्हा होईल, तर जेव्हा, निसर्ग आणि समाज यांच्या संदर्भातले माणसाचे दैनंदिन संबंध त्याला अगदी स्पष्ट होतील आणि त्यांची तर्कशुद्धता त्याच्या बुद्धीला पूर्ण पटेल. कम्युनिस्ट (साम्यवादी) समाजरचनेतला माणूस असा असेल हे मार्क्सने इतरत्र सांगितलेले आहेच.

निसर्गपूजादी गोष्टींची मार्क्सने जी मीमांसा केली आहे तिच्या प्रकाशात मार्क्सचा सिद्धांत कसा दिसतो हे पाहणे आपल्या विवेचनाच्या दृष्टीने उपयुक्त ठरेल. धर्म हा दुर्दशेने–दैन्याने ग्रासलेल्या जगाचा उसासा आहे. माणसाच्या हरवलेपणाचे ते फलित आहे. म्हणजेच परात्मतेमुळे निर्माण झालेली ती खोटी जाणीव किंवा फसवी संज्ञा आहे. आता उत्पादनाला क्रयवस्तूचे स्वरूप येणे हे परात्मतेचे एक फार मोठे कारण मार्क्सने सांगितलेले आहे. म्हणजे मार्क्सने निर्देशिलेल्या प्राचीन समाजव्यवस्थेत परात्मता असलीच तर अगदी कमी प्रमाणात असणार. मग तेथे निसर्गपूजेसारखे प्रकार का आढळतात? मार्क्सने 'द जर्मन आयडिऑलॉजी' मध्ये त्याचे कारण सुचविलेले आहे– ते म्हणजे मानवाची निसर्गाकडे व इतरांकडे पाहण्याची मर्यादित दृष्टी. (मार्क्स मानव आणि निसर्ग यांच्या एकरूपते– identity– चीही भाषा करतो, पण तशी पूर्ण एकरूपता असती तर निसर्गपूजा वगैरेची गरजच उद्‌भवली नसती. निसर्गापासून थोडे दूर होऊन त्याचा काही विचार मानव करू लागला म्हणूनच निसर्गपूजेसारखे प्रश्न उद्‌भवले.) पण मर्यादित दृष्टी म्हणजे काय? ते मार्क्स सांगत नाही. मार्क्सच्या काळातही एवढे स्पष्ट होते, की प्राचीन मानवाची निसर्गपूजा हा यातूचा (जादूटोण्याचा) प्रकार होता. अनेक नैसर्गिक चमत्कार आणि निसर्गाचे विलक्षण उद्रेक यांनी भांबावलेला मानव निसर्गात, निसर्गाच्या रूपांत (झाडात, दगडात, ढगात, विजेत वगैरे) दैवी शक्ती पाहत होता आणि या शक्तीची पूजा–प्रार्थना केली तर ती प्रसन्न होईल आणि अनुकूल होईल असे त्याला वाटत होते. यात जी परात्मता (alienation) होते त्याचा क्रयवस्तूशी अगर समाजरचनेशी काही संबंध नव्हता. निसर्ग आणि मानव यांचा जो संबंध होता तो येथे प्रधान होता. मार्क्स निसर्ग–मानवसंबंधाचा विचार करतो तो मुख्यतः उत्पादनशक्तीच्या संदर्भात करतो. पण निसर्गाशी मानवाचा एवढाच मर्यादित संबंध असतो असे समजण्याचे कारण नाही. उषःसूक्तेसारख्या प्रार्थना म्हणणारे अगर उपनिषदांचे तत्त्वज्ञान सांगणारे वैदिक अगर वेदोत्तरकालीन ऋषी निसर्गाकडे याहून अधिक व्यापक दृष्टीने पाहत होते. 'किर्लोस्कर' मासिकाच्या ७०० व्या अंकात प्रा. मे. पुं. रेगे यांनी सांगितल्याप्रमाणे, "विश्वाच्या आणि मानवी व्यक्तिमत्त्वाच्या समग्र स्वरूपाचे एक चित्र माणसाला हवे असते, असे चित्र बनविण्याकडे त्याची खोल प्रवृत्ती असते आणि ह्या चित्राच्या संदर्भात कशा रीतीने जगले

असता माणसाला त्याचे खरेखुरे साफल्य लाभते हे त्याला समजून घ्यायचे असते." आपले वैदिक ऋषी हेच करीत होते. प्राचीन मानवही याच उद्योगात होता, आणि आधुनिक माणसालाही अद्याप ही विवंचना असतेच. मार्क्स खरोखर या प्रश्नाकडे १९ व्या शतकातील निःशंक वृत्तीने पाहत होता आणि या निःशंक वृत्तीला त्याने आपल्या प्रतिभेने एक सैद्धांतिक अधिष्ठान दिले होते. पण आज आपण जाणतो, की अशा अधिष्ठानांना फारसा आशय प्राप्त झालेला नाही. निसर्ग आणि विश्व यांच्या गूढाबद्दल आज जाणते लोक जरा जपूनच बोलतात. त्यांना डॉ. लुई टॉमस यांचा इशारा प्रकर्षाने जाणवत असतो. हा प्रसिद्ध अमेरिकन प्राणिशास्त्रज्ञ एकदा म्हणाला होता, की प्राणिशास्त्राचा गेल्या शंभर वर्षातला सर्वांत बुद्धी थरारणारा शोध हा आहे, की आपले अज्ञान प्रगाढ आहे. अणुगर्भविश्वातील उप-अणूंच्या अतर्क्य वर्तनामुळे भांबावलेले पदार्थ-विज्ञानशास्त्रज्ञ विश्वाच्या 'नियमां' बद्दल ठाम बुद्धीने बोलायलाच तयार नाहीत. कित्येक वैज्ञानिकांना तर असेही वाटते, की या विश्वाच्या मुळाशी काही योजना आहे, काही हेतू आहे. आजच्या विज्ञान युगात ही स्थिती, तर त्या अज्ञान-युगातल्या मानवाच्या निसर्गपूजेकडे जरा औदार्याने पाहण्यास हरकत नाही. मानवाच्या निसर्गाशी आणि मानवाशी असलेल्या संबंधांचे स्पष्ट बुद्धिगम्य ज्ञान मानवाला होईल आणि धर्माचे विसर्जन होईल हा मार्क्सचा आशावाद हा सुद्धा त्याच्या ठामबुद्धीचा विकास म्हणायचा. ही सुद्धा एक श्रद्धाच !

मार्क्सचे आणखी एक विधान असे आहे, की ख्रिश्चन धर्म हा क्रयवस्तूवर भर देणाऱ्या भांडवलशाहीचा स्वाभाविक धर्म आहे. कारण काय तर हा धर्म अमूर्त मानवाचे बंड माजवितो. क्रयवस्तूमुळे आर्थिक व्यवहाराला एक अमूर्तता येतेच. या दोन अमूर्ततेचे नाते मार्क्सने पाहिले आहे. पण ख्रिश्चन धर्माचा गुलामगिरीशी अधिक साहजिक संबंध जोडून दाखविता येईल. ख्रिश्चन धर्मातले Resist not evil-दुष्टाव्याला प्रतिकार करू नका- हे शरणागतीचे तत्त्वज्ञान गुलामगिरीला मानवणारे आहे. गुलामांनी त्याचा एक प्रकारच्या तितिक्षेने स्वीकार केला असेल तर गुलामांच्या मालकांनी त्याची उपयुक्तता अचूक हेरली असेल.

पण ख्रिश्चन धर्माच्या दृष्टीने महत्त्वाची गोष्ट अशी, की तो कोणत्याही परिस्थितीत जन्माला आला असला तरी त्याचा प्रभाव एकदोन कालखंड ओलांडून, आजपर्यंत टिकून आहे. हिंदू धर्माबद्दल, बुद्ध धर्माबद्दल, इस्लाम धर्माबद्दलदेखील असे म्हणता येईल. इस्लाम धर्म ज्या आर्थिक परिस्थितीत जन्मला तिच्यात आणि आज इस्लामचे जोरदार पुनरूज्जीवन होत असताना जी आर्थिक परिस्थिती आहे तिच्यात काही तरी साम्य आहे का ? याचाच अर्थ असा, की धर्माच्या तत्त्वज्ञानात आणि आचरणात असे काही तरी आहे, की जे आर्थिक रचनेच्या पार पलीकडे जाते आणि मानवाच्या मनाला भावते. निसर्ग आणि मानव यांच्यात जो सनातन संबंध आहे आणि ज्याचे गूढ, आज विज्ञानाची अपरंपार प्रगती झाली असूनही, उलगडलेले नाही, उलट थोडेबहुत दाटलेलेच आहे. त्याच्यात धर्माच्या आकर्षणाचे रहस्य असावे असे म्हणावेसे वाटते.

आता एवढे खरे की प्रॉटेस्टंट मनोवृत्ती आणि भांडवली मनोवृत्ती यांच्यात काही तरी आत्मीय नाते असावे. मॅक्स वेबरसारख्या प्रतिभाशाली समाजशास्त्रज्ञांनी या नात्यात खूप अर्थ पाहिला आहे. पण या नात्याचा अर्थ Religion is the reflex of the real world या मार्क्स-वचनाच्या आधारेच लागतो असे थोडेच आहे ? प्रॉटेस्टंट धर्माने काटकसरीचे जे पाठ दिले ते भांडवलाच्या संचयाला उपयोगी पडले असे समाजशास्त्रज्ञ म्हणतात. पण प्रॉटेस्टंट वादातला व्यक्तिवाद आणि भांडवलशाहीत स्वाभाविक अवसर मिळालेला व्यक्तिवाद यांचेही नाते पाहता येईल. मार्क्सने ते क्रयवस्तूंच्या वाढीतून येणाऱ्या अमूर्ततेत पाहिले होते. मार्क्स धर्माकडे सरळसरळ वर्गीय दृष्टीने पाहताना फारसा दिसत नाही. ते त्याच्या एंगल्सप्रभृती अनुयायांनी केले. आता ही गोष्ट खरीच आहे, की सत्ताधारी आणि वरिष्ठ वर्ग धर्माचा उपयोग आपल्या सत्तासंपत्तीच्या संरक्षणासाठी आणि अभिवृद्धीसाठी करीत असतात. जेव्हा धर्म प्रचलित समाजव्यवस्थेची भलावण करतो आणि दलित वर्गांना या समाजव्यवस्थेला आव्हान देण्यापासून परावृत्त करतो, तेव्हा

अनुक्रमणिका

तो सत्ता-संपत्तिधारकांची सेवा करीत असतोच. ( आणि अशा परिस्थितीत 'धर्म ही अफूची गोळी आहे' हे मार्क्सचे वर्णन फिट्ट बसते. ) पण येथे वैश्विक धर्म आणि संस्थात्मक धर्म यांच्यात फरक करायला हवा. धर्माची वैश्विक तत्त्वे किती लोकांना खरोखर कळतात, किंवा किती लोकांचा त्यांच्याशी भावबंध अगर बुद्धिबंध जुळलेला असतो हा एक प्रश्नच आहे. बहुतेक लोकांची निष्ठा आचारधर्मातच गुंतलेली असते, आणि या आचारधर्माचे ठेकेदार–पाद्री, मौलवी वगैरे सत्ता-संपत्तिधारकांचा अनुनय करण्यात धन्यता मानतात, कारण त्यांची धार्मिक पदे आणि धार्मिक इस्टेटी या अनुनयावर पोसल्या जातात. गेल्या महायुद्धात नात्सी फॅशिस्ट राष्ट्रांतला चर्च नात्सी–फॅशिस्टांच्या बाजूने आणि लोकसत्ताक राष्ट्रातला चर्च नात्सी–फॅशिस्टांच्या विरुद्ध उभा राहिला हे उदाहरण या दृष्टीने फार बोलके आहे. चर्च तेव्हा धर्मतत्त्व अगर राजकीय तत्त्व यांच्या दृष्टीने विचार करीत नव्हता. फार तर राष्ट्रतत्त्वपालनाचे श्रेय त्याला देता येईल. पण धर्माच्या वैश्विक तत्त्वाप्रमाणे हे श्रेयही फजूल ठरते.

या दृष्टीने सत्ता–संपत्तीधारकांनी चर्चचा उपयोग करून घेणे, त्यासाठी त्याला मदत वगैरे करणे साहजिक ठरते. पण एवढ्यामुळे धर्म ही वर्गीय विचारप्रणाली (class ideology) ठरते का ? ती जर वरिष्ठ वर्गाची विचारसरणी असेल तर धर्माचा प्रभाव वरिष्ठ वर्गांपुरताच असायला हवा. पण धर्माचा प्रभाव सर्वच वर्गांवर दिसतो. किंबहुना पिळल्या गेलेल्या वर्गांवर तो अधिकच दिसतो. आता या वर्गांची आर्थिक दृष्टी वेगळी असते. पुष्कळदा त्यांची राजकीय दृष्टीही वेगळी दिसते. सत्तासंपत्तिधारक ज्या पक्षाला मदत करतात त्यांच्या विरुद्धपक्षांना दलित वर्ग साधारणपणे पाठिंबा देतात. तेव्हा धर्माला वर्गीय विचारप्रणाली (ideology) म्हणण्यात विचाराची ओढाताण होते असे दिसते. अर्थात मार्क्सने असे म्हटले आहे, की the ruling ideas of an age are the ideas of the ruling class. हा न्याय धर्माला लावला तर एखाद्या कालखंडात जो वरिष्ठ वर्ग असतो त्याचा धर्म तो त्या समाजाचा प्रभावशाली धर्म असे म्हटले पाहिजे आणि असा तो असल्याखेरीज, म्हणजे इतर वर्गांवर त्याचा प्रभाव पडत नसेल तर, सत्ताधारी वर्गाला त्याचा काही उपयोगही नाही. प्रश्न असा आहे, की इतर वर्गांना या धर्माचे इतके आकर्षण का ? धर्म ही एक खोटी जाणीव किंवा फसवी संज्ञा (false consciousness) असे म्हटल्याने याचा अर्थ लागतो. धर्म म्हणजे मग एक भूलच ठरते. पण मग प्रश्न असा, की ज्या अर्थाने तो वरिष्ठ वर्गांचा बुद्धिभेद करतो त्याच अर्थाने तो कनिष्ठ वर्गांचा बुद्धिभेद करतो काय ? धर्माचरणामुळे, धर्माचा प्रभाव वाढावा म्हणून केलेल्या दानधर्मादी गोष्टींमुळे आपल्याला मोक्ष मिळेल, निदान आपल्या नफेगिरीबाबत आपल्याला अपराधी वाटण्याचे कारण नाही असे वरिष्ठ वर्गातील व्यक्तींना वाटत असते, पण त्यांचा खरा पोटातला हेतू धर्माच्या प्रभावामुळे आपल्याला सत्तासंपत्तीचा लाभ करून देणारी समाजरचना खालच्या वर्गातील लोकांनी सहन करावी असा असतो– ही त्यांची खोटी जाणीव. आपल्या पूर्वकर्मामुळे ही अवस्था आपल्या नशिबी आली, ती सहन केली पाहिजे– ही दलित वर्गीयांची खोटी जाणीव. तरीपण प्रश्न उरतो तो असा की, हे पिळले जाणारे वर्ग वरिष्ठवर्गीयांच्या हिताला कारण ठरणाऱ्या धर्माला पाठिंबा देता देता त्यांच्या राजकारणाला मात्र विरोध करतात तो कसा ? अशा परिस्थितीत धर्म ही एक वर्गीय विचारप्रणाली आहे हे म्हणणे योग्य ठरेल काय ?

या संबंधात जॉन प्लामेनात्स यांनी उत्पन्न केलेला मुद्दा महत्त्वाचा वाटावा. धर्माची तत्त्वे आणि प्राक्कथा ( mytsh ) दलितवर्गीयांचा अधःपातच करतात असे नाही. धर्मनिष्ठाचा, एक नैतिक व्यक्ती म्हणून त्या स्वाभिमान वाढवू शकतात. स्वत्वाचा विकास करू शकतात. त्याच्या काही अंतस्थ कांक्षांचे समाधान करू शकतात. निराशेच्या गर्तेत रुतून हतबल होण्यापेक्षा ही स्वत्वसंरक्षक आशा स्वागतार्ह नाही काय ? या युक्तिवादाला अर्थात उत्तर आहे. ही खोटी आशा काय कामाची ? क्रांतीची किंवा दलितवर्गीयांच्या उद्धाराची परिस्थिती उत्पन्न झाल्यास तिचा फायदा ही खोटी आशा घेऊ शकेल काय ? खरी गरज

आहे ती जिला दैवी असंतोष ( divine discontent ) म्हणतात त्याची. पण हा दैवी असंतोष धर्माने नष्ट होतो असे वाटत नाही. ब्रिटिश समाजवाद्यांनी मार्क्सवादाचा स्वीकार केला नाही याचे कारण त्यांची ख्रिश्चन धर्मावरची श्रद्धा. पण या श्रद्धेने त्यांचा दैवी असंतोष गाडला नाही. यावर असा युक्तिवाद केला जातो की, ब्रिटिश मजूरवर्गाने क्रांतिकारक मार्क्सवादाचा स्वीकार केला नाही याचे कारण ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या लुटीत राज्यकर्त्यांनी कामगारांना भागिदारी दिली, व त्यामुळे त्यांच्या निष्ठा भ्रष्ट झाल्या. पण ही साम्राज्यशाही संपुष्टात येऊन तीसपस्तीस वर्षे झाली, तरी ते मार्क्सवादी आणि क्रांतिवादी बनले नाहीत, आणि स्वतःच्या हक्कांसाठी झगडण्याचेही थांबले नाहीत. एकंदरीत धर्म हे बरेच व्यामिश्र प्रकरण आहे. त्याचा वर्गीय विचारसरणीने सहजासहजी अर्थ लागत नाही. मार्क्सला वाटले तसा तो उत्पादनपद्धतीचा सरळसरळ प्रतिक्षेप नाही. उत्पादनपद्धती आणि आर्थिक रचना या फार महत्त्वाच्या गोष्टींमुळे त्यांचा धर्मकारणावर परिणाम होतोच, पण धर्माचा उगम माणसाच्या अंतःकरणात खोल दडलेल्या एखाद्या गरजेत शोधला पाहिजे असे वाटते. प्रा. मे. पुं. रेगे यांचा आणखी एकदा हवाला देऊन बोलायचे म्हणजे, " अस्तित्व हे अखेरीस एक गूढ आहे. विज्ञानाने प्रकाशित केलेल्या जगाला वेढणारे, त्याच्या बुडाशी असणारे हे गूढ आहे आणि माणसाच्या जाणिवेत हे गूढ व्यक्त होते, त्याच्या अनेक खाणाखुणा माणसाला आपल्या अनुभवात सापडतात, त्यांचा अर्थ लावून, त्याच्याशी साक्षात् संबंध जोडण्यात, एकरूप होण्यात मानवी जीवनाचे साफल्य असते...ही धार्मिक श्रद्धा, मानवी अनुभवापलीकडे असलेल्या पण त्याच्यात हरतऱ्हेने प्रतिबिंबित होणाऱ्या 'अनंता'ची जाणीव, आणि या अनंतत्वाशी योग्य ते नाते जोडण्याची प्रेरणा माणूस असण्याचा एक भाग आहे." मार्क्सने याकडे लक्ष दिले नाही, कारण धर्माकडे तो सामाजिक परिवर्तनाच्या दृष्टीने पाहत होता. पण इतक्या वर्षांनी मार्क्सवाद्यांनी याकडे लक्ष देण्यास हरकत नाही. निदान रशियात क्रांतीला साठ वर्षे होऊन गेल्यानंतरही तेथे धर्माचे समूळ निरसन होत नाही या गोष्टीमुळे तरी त्यांनी या प्रश्नाकडे नवीन दृष्टीने पाहायला हवे, ते होत नाही. कारण त्यांचीही एक श्रद्धाच असते.

धर्माप्रमाणेच नीतीचाही साधकबाधक विचार मार्क्सने केलेला नाही. समाजाच्या आर्थिक रचनेचा नीती हा सरळ स्त्राव ( direct efflex ) कसा असतो, मानवाच्या भौतिक जीवनाचा तो प्रतिक्षेप अगर प्रतिबिंब किंवा परिणाम कसा असतो हे मार्क्सने दाखविलेले नाही. नैतिक मूल्ये कशी निर्माण होतात, का निर्माण होतात, एकदा निर्माण झाली म्हणजे ती का टिकतात, त्यांना धर्माज्ञेची प्रतिष्ठा कशी प्राप्त होते वगैरे गोष्टींचा विचार मार्क्सने केलेला नाही. इतकेच काय पण समाजाची नैतिक यंत्रणा आणि नीतिशास्त्र यांचेही संबंध त्याने तपासून पाहिलेले नाहीत. नैतिक यंत्रणेचे वैधिक ( legal ) यंत्रणेशी, धार्मिक यंत्रणेशी वगैरे कसे व कोणते संबंध असतात यावरही विशेष प्रकाश त्याने टाकलेला नाही. साधारणपणे वर्गीय नीतीबद्दल तो बोलतो. अर्थात व्यक्तीच्या हितसंबंधांनी त्याची नीती ठरते, अगर नीतीचा आविष्कार म्हणजे वर्गीय हितसंबंधांचा नंगा नाच असली विधाने तो करीत नाही. पण मानवाच्या इतिहासात नीतीचा उद्भव कसा झाला, आणि तिचा अंमल आणि शास्त्र कसे बदलत गेले याची नीटशी चवकशी त्याने केलेली नाही.

त्याने भांडवली नीतीवर कठोर प्रहार केलेले आहेत. वर्गीय नीतीचा उल्लेख त्याने वारंवार केलेला आहे. नीतीचे शाश्वत नियम असतात हे अर्थात त्याने साफ नाकारलेले आहे. पण समाजात वर्गीय नीती असते, म्हणजे सत्ताधारी वर्गाची नीती एकजात सर्वांच्या माथी मारली जाते, तेवढीच एक नीती अस्तित्वात असते; की निरनिराळ्या वर्गांच्या निरनिराळ्या नीती असतात; की वर्गीय नीतींखेरीज सर्व समाजाला लागू पडणारी अशी समान नीती असते, इत्यादी प्रश्नांवर सुस्पष्ट असे विवेचन मार्क्समध्ये आढळत नाही. साधारणपणे असे म्हणता येईल, की मार्क्सच्या मते काही एक समान नीती असते पण ती वर्गीय हितसंबंधांनी विकृत बनलेली असते. तो वर्गीय नीतीचा निर्देश करतो, याचा अर्थ सारी नीती वर्गीय असते असे नव्हे, पण एकंदर नीतीची वर्गीय हितसंबंधाने कुतरओढ होते, असे त्याला वाटत असावेसे दिसते.

खरे म्हणजे मार्क्सची विचार करण्याची जी पद्धती आहे तिला नीतीचा प्रश्न फार भावायला हवा होता. मानवाचे निसर्गाशी आणि समाजाशी जे संबंध असतात त्याच्यावर मार्क्स फार भर देतो. मानवाला जगण्यासाठी निसर्गावर आघात करावेच लागतात. त्यामुळेच उत्पादनशक्तींना किंवा उत्पादन साधनांना फार महत्त्व येते. उत्पादन-साधने म्हणजे अखेरीस तंत्रज्ञान. ( म्हणून एच. बी अॅक्टनने 'ऐतिहासिक भौतिक वादा' ला 'इतिहासाचे तंत्रज्ञानात्मक निरूपण' असे म्हटले आहे. ) मार्क्सने हे 'भांडवल' मध्ये स्वच्छच मांडले आहे : "मानवाचे तंत्रज्ञान तो निसर्गाशी कसा मुकाबला करतो ते स्पष्ट करते, म्हणजे माणूस जिने जगतो त्या उत्पादनप्रक्रियेचे स्वरूप स्पष्ट करतो; आणि त्यायोगे सामाजिक संबंध बांधले जाण्याची पद्धती आणि त्यातून निघणाऱ्या बौद्धिक संकल्पना तो उघडया करतो." म्हणजेच माणसाचे निसर्गाशी आणि समाजाशी असलेले संबंध एकमेकात गुंततात. आता एवढे सहज ध्यानात येईल की मानवाचे निसर्गाशी जे संबंध असतात ते समाजाशी असणाऱ्या संबंधापेक्षा अधिक मूलभूत आणि तुलनेने कमी गुंतागुंतीचे असतात, आणि निरनिराळ्या कालखंडात साधारणपणे एकाच प्रकारचे असतात. म्हणजे मानव निसर्गाकडे साधारणपणे आपल्या पोटापाण्याची सोय करणारे निधान या दृष्टीने पाहतो. ( निसर्गाकडे मानव अर्थात सौंदर्यास्वादाच्या दृष्टीने आणि एक रहस्यमय गूढ या दृष्टीनेही पाहतो— पण तो तसा समाजाकडेही पाहू शकतो. ) मानवाचे समाजाशी असलेले संबंध त्या मानाने गुंतागुंतीचे आणि बदलते असतात. रानटी शिकारी ज्या दृष्टीने जनावराकडे पाहतो त्याच दृष्टीने आजचा शिकारी पाहतो. आदिम शेतकऱ्याला भूमी जशी दिसते तशीच आजच्या शेतकऱ्याला दिसते. आणि रात्री रानटी मानव ज्या अद्भूत दृष्टीने आकाशाकडे पाहात असे त्याच अद्भूत दृष्टीने आजचा वैज्ञानिकही पाहतो. पण ग्रीक माणूस अगर वैदिक ऋषी जसा समाजाकडे पाहतो तसे मध्ययुगीन माणसानेही पाहिले नाही आणि आजचा माणूसही पहात नाही आणि तरी ग्रीक, मध्ययुगीन आणि आधुनिक माणसाचे समाजाशी- नातेवाइकांशी, समव्यवसायिकांशी, इतरांशी जे संबंध आहेत त्यात एक साम्यही आहे. त्यात स्पर्धा आहे तसे सहकार्य आहे, स्नेह आहे तसा अविश्वास आहे, एक आश्वासन आहे त्याप्रमाणे आशंकाही आहे. आता मानवाची नीती त्याच्या निसर्गाशी, समाजाशी असलेल्या संबंधांतून निर्माण होते आणि ज्या प्रमाणात हे संबंध प्राचीन कालापासून आजवर तसेच आहेत त्या प्रमाणात ही नीती 'शाश्वत' असते आणि ज्या प्रमाणात ते बदलत असतात त्या प्रमाणात ती परिवर्तनशील असते. हे सारे इतके सोपे आणि स्पष्ट आहे की मार्क्सने परिवर्तनीय नीती आणि अपरिवर्तनीय नीती यांचे स्वरूप आणि संबंध निश्चित करून परिवर्तनीय नीती वर्गीय कशी बनते हे दाखवून द्यायला हरकत नव्हती. पण तसे काही त्याने केलेले दिसत नाही.

मानवाचा आणखी एक महत्त्वाचा-अतिमहत्त्वाचा संबंध आहे आणि मार्क्सने त्याचा या दृष्टीने अजिबात विचार केलेला दिसत नाही. तो म्हणजे मानवाचा स्वतःशी असलेला संबंध, माणसाचा 'मी' शी असलेला संबंध. वरचे दोन संबंध-निसर्गाशी आणि समाजाशी संबंध-आणि हा तिसरा स्वतःशी असलेला संबंध यांत एक महत्त्वाचा फरक आहे, आणि त्याची दखल घ्यायला हवी. माणसाचे निसर्गाशी आणि समाजाशी संबंध असतात ते ज्ञानेंद्रिये आणि संकल्पनाबुद्धी यांच्या मध्यस्थीने आलेल्या अनुभवातून निर्माण झालेले असतात तर माणसाचा स्वतःशी असलेला संबंध हा साक्षात (intuitive) संबंध असतो. आणि म्हणून या संबंधातून निर्माण झालेली नीती ही इतर संबंधांतून निर्माण झालेल्या नीतीपेक्षा गुणात्मक दृष्टीने निराळी असते. प्रथम म्हणजे ती वैयक्तिक असते. माणसाचे या संबंधाने स्फुरलेले नैतिक निर्णय ( ते जर खरेखुरे आत्मस्फूर्त असतील तर ) वैयक्तिक असतात. उदाहरणार्थ, मनुष्य जेव्हा निष्ठेने ब्रह्मचर्याचा अगर अन्नत्यागाचा निर्णय घेतो तेव्हा तो त्याचा खास वैयक्तिक असा नैतिक निर्णय असतो. निसर्ग आणि समाज यांच्याशी निगडित असणाऱ्या नैतिकतेचे तर्कशास्त्र येथे लागू पडणारच नाही. मार्क्सने या नीतीचा विचार केलेलाच नाही. येथे सुद्धा त्याची दृष्टी सामाजिकच होती.

मार्क्स भांडवली नीतीवर ( bourgeois morality) प्रखर प्रहार करतो. 'कम्युनिस्ट मॅनि-

अनुक्रमणिका

फेस्टो'त तो भांडवलशाहीतले एकेक नैतिक अधिष्ठान घेतो आणि त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या करतो. विचारतो, तुमची कुटुंबसंस्था कशावर उभी आहे? तर भांडवल आणि खाजगी नफा. ही कुटुंबसंस्था कोठे आढळते? तर भांडवलदार वर्गात. कामगारात तिचे धिंडवडे उडाले आहेत आणि वेश्याव्यवसायाचे काय? आई-बाप आणि मुले यांचे संबंध? कारखान्यात आणि इतरत्र कष्टणाऱ्या कोवळ्या मुलांकडे पाहा, म्हणजे या अतिपवित्र संबंधाचे स्वरूप तुमच्या ध्यानात येईल. खरोखर कौटुंबिक संबंधांच्या पावित्र्याबद्दल बोलणे म्हणजे आज एक अभद्र चेष्टा आहे. कामगारांच्या कौटुंबिक संबंधांचे भांडवलशाहीने साफ वाटोळे केले आहे. आणि हे संबंध खरोखर पवित्र राहिले आहेत का? भांडवलदार तर आपल्या बायकोकडे एक उत्पादनाचे साधन म्हणून पाहतो. हे भांडवलदार स्वतःच्या बायकांना अशी अमानुष साधने तर बनवतातच, पण कामगारांच्या स्त्रिया आणि मुली यांना बाटवतात, आणि एकमेकांच्या बायका फितविण्यात धन्यता मानतात. खरे म्हणजे भांडवलशाहीत प्रत्येक पवित्र संबंधाची विटंबना झाली आहे. प्रत्येक पवित्र संबंध पैशाच्या शेणकाल्यात बुडवून काढलेला आहे. पैसा हाच येथे परमेश्वर बनला आहे!

भांडवलशाहीबद्दल मार्क्स विलक्षण संतापाने लिहितो. भांडवली अवस्था ही मानवी इतिहासातली प्रगत अवस्था असा सिद्धांत तो मांडतो, पण भांडवलशाहीविषयीच्या त्याच्या लेखनात ही भावना फार करून आढळत नाही. एकंदरीत भांडवलशाहीच्या सर्वच आविष्कारांचा तो निकराचा अधिक्षेप करतो. मार्क्स हा प्रथम क्रांतिकारक होता आणि नंतर सिद्धांतकार होता. त्याचे सारे सिद्धांतच क्रांतीच्या दर्शनाने स्फुरलेले होते. मार्क्सच्या नैतिक संतापामुळे एक गोष्ट झाली आहे. त्याची लेखनशैली– त्यावेळच्या वाङ्मयीन आततायीपणाच्या स्वैर पाशात अडकलेली असूनसुद्धा– अनेक ठिकाणी अतिशय मनोवेधक झाली आहे.

भांडवलशाहीवर मार्क्सचा जो इतका नैतिक राग आहे त्याचे एक कारण असे, की त्याला भांडवली व्यवहारात सर्वत्र अमानुषपणा दिसे. माणुसकीचा अभाव दिसे. कामगारांच्या, त्यांच्या बायकापोरांच्या पिळणुकीने, त्यांच्या बीभत्स अशा दरिद्री जीवनक्रमामुळे त्याच्या संतापाला विलक्षण धार आली होती. मार्क्सला दुसरी गोष्ट जाणवे ती म्हणजे भांडवलशाहीतला मानवी संबंधांचा हरवलेला चेहरा. भांडवलशाहीत दर्शन घडते ते मानवी चेहऱ्याचे नाही तर नाण्यावरील मुद्रेचे. भांडवलशाहीत सर्व संबंधांना एक दारुण अमूर्तता प्राप्त झालेली असते. या अमूर्ततेला रूप प्राप्त होते ते पैशाचे. भांडवलशाहीत प्रत्येक संबंधाला क्रयवस्तूचे स्वरूप आले आहे. भांडवलशाहीतील या व्यक्तित्वविलोपाने मार्क्सचे अंतःकरण व्याकुळते. माणसाची किंमत पैशाने व्हायला लागली, की त्याच्या अंगभूत व्यक्तित्वाकडे दुर्लक्ष होणारच. व्यक्तित्वविकसन हे एक केवळ साधन बनणारच. मानवी व्यक्ती तिच्या व्यक्तित्वापेक्षा तिच्या व्यवसायाने ओळखली जाणारच. समाजाच्या व्यावहारिक लिपीतले ते एक निर्जीव अक्षर बनणार. समाजाच्या गणितातला तो एक निवळ आकडा ठरणार. भांडवलशाहीत व्यक्तिवादाला फार मोठे तात्त्विक महत्त्व प्राप्त होते. पण प्रत्यक्ष व्यवहारात व्यक्तीची विटंबना होते. व्यक्तिवाद हा भांडवलशाहीतला एक मोठा वदतोव्याघात आहे. खरोखर 'सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ते' अशी स्थिती झाल्यावर व्यक्तित्वाची विटंबना झाली, कुटुंबाची धूळधाण उडाली, माणुसकीची परवड झाली तर त्यात नवल ते काय? यातूनच व्यक्तीची ती परात्मता, माणसाचा तो हरवलेपणा निर्माण झाला असा मार्क्सचा निर्णय आहे.

हे सारे ठीक आहे. पण या चित्राची दुसरी बाजू मार्क्सने नीटशी पाहिली नाही, निदान तिची घ्यावी तशी दखल घेतली नाही असे म्हणणे भाग आहे. भांडवलशाही ही प्रगत अवस्था आहे असा नुसता व्यापक शेरा मारून भागत नाही. भांडवलशाहीत व्यक्तीचे व्यक्तित्व हरवले, तिचा चेहरा नजरेआड झाला, तिच्या जीवनाला अमूर्त स्वरूप आले हे जसे एका अर्थाने खरे आहे त्याचबरोबर व्यक्ती अनेक जाचक सरंजामी बंधनातून मुक्त झाली, तिच्या अंगच्या प्रेरकशक्तीला वाव मिळाला ही गोष्ट नाकारता येणार नाही. कामगारांची निर्घृण पिळणूक झाली ही गोष्ट खरी, पण या पिळणुकीवर प्रकाश पाडणारे अंमलदार होते (त्यांच्या वृत्तांतावरून तर मार्क्सने आपले आरोपपत्रक तयार केले), आणि मुख्यतः कामगारांच्या दैन्य–दारिद्र्यामुळे



अनुक्रमणिका

प्रेरित होऊन अनेक स्वातंत्र्यवादी आणि समाजवादी विचारवंत निर्माण झाले. भांडवलशाहीत माणसाची बुद्धी स्वतंत्र झाली, तिने सर्जनशीलतेचे अनेक वैज्ञानिक आणि तत्त्वज्ञानीय चमत्कार केले हे लक्षात घेतले पाहिजे. 'भांडवलशाहीचे प्रतिक्षेप' अशी त्यांची वासलात लावून भागणार नाही. भांडवलशाहीत जे प्रबोधन झाले त्याचेच मार्क्स स्वतः अपत्य होता हे विसरून चालणार नाही.

सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे भांडवली नीतीचा अधिक्षेप करताना नीतीच्या तात्त्विक अंगाकडे मार्क्सने दुर्लक्षच केले. प्रथम म्हणजे नैतिक निर्णय हा माणसाचा एक अतिशय वैयक्तिक निर्णय असतो इकडे मार्क्सने लक्षच दिले नाही. हे सोडाच, पण काही साधे प्रश्न मार्क्सने उपस्थित केलेले दिसत नाहीत. उदाहरणार्थ, भांडवलशाहीतली सारी नीतिमत्ता एकजात भांडवलवाल्यांच्या हिताची असते का? भांडवलवाल्यांची नीती आणि कामगारांची नीती यांत फरक असला तर तो नेमका काय आहे? भांडवली नीती म्हणून जिचे वर्णन केले जाते त्यात परंपरागत अगर पूर्वीच्या कालखंडातून चालत आलेली नीती किती व ती कशी कार्यान्वित होते? भांडवली नीतीत मालकी हक्काची कदर करावी, चोरी करू नये, करारमदारांची इमानदारी राखावी, वगैरे नीतीचे जे प्रकार आहेत त्यात शाश्वत अंश किती आहे? त्यांत मनुष्यस्वभाव आणि सामाजिक रचनेच्या गरजा यांचा भाग किती? माणूस सर्रास खोटे बोलला तर समाजाची उभारणी सोडा, पण माणसामाणसातील प्राथमिक व्यवहार अशक्य होईल, हे स्नेह, सहकार्य वगैरे गोष्टींबद्दल खरे असेल तर त्याचा भांडवली नीतीत काही आविष्कार होतो का? अशा प्रकारचे प्रश्न मार्क्स उपस्थितच करीत नाही. मार्क्स मानवी व्यवहारातील अमूर्ततेवर, अप्रत्यक्षतेवर, व्यक्तिभावाच्या अभावावर कोरडे ओढतो. पण जीवनात यांनाही काही स्थान असते हे तो ध्यानात घेत नाही. प्लामेनात्सनी दाखवून दिल्याप्रमाणे, विशाल व्यापक समाजात जेव्हा अनेक व्यक्तींशी, अपरिचित व्यक्तींशी, अनेक स्तरांवर वागायचे असते तेव्हा वैयक्तिक भावभावना काबूत राखणे, शक्य तर त्यांना अजिबात अवसर न देणे, अपरिहार्य ठरते. त्याने कार्यक्षमतेत भरच पडते. डॉक्टर किंवा पोलिस-अधिकारी याने आपल्यापुढे आलेल्या प्रकरणात स्वतःच्या भावना गुंतवायच्या ठरविल्या तर आफतच ओढवेल. आपल्या निर्णयाचा प्रत्येक व्यक्तीच्या वैयक्तिक जीवनावर काय परिणाम होईल असा सरकारी अधिकारी विचार करू लागला तर तो निर्णयच घेऊ शकणार नाही. व्यक्तीच्या उपक्रमशीलतेस वाव मिळणे ही गोष्ट मार्क्सलाही महत्त्वाची वाटावी. पण या उपक्रमशीलतेस, ज्या समाजात अनेक लोकांशी, अनेक स्तरांवरून, अनेक प्रकारचा व्यवहार, वैयक्तिक भावभावना अगर हिताहित न गुंतवता करावा लागतो त्याच समाजात विशेष वाव मिळण्याचा संभव असतो. अगदी साधी गोष्ट घेतली तरी अशाच समाजात व्यक्तीस स्वतःच्या मनाजोगता, स्वभावास आणि कर्तृत्वास मानवणारा व्यवसाय निवडण्याची शक्यता अधिक असते.

पण हे सारे दृष्टीआड केले तरी एक गोष्ट कटाक्षाने मांडली पाहिजे ती अशी, की हा अमूर्ततेचा, व्यक्तिविलोपनाचा मुद्दा मार्क्स जो मांडतो ते भांडवलशाहीचे खास फलित असे नव्हे तर ते उद्योगीकरणाने अपरिहार्य केलेल्या अवाढव्य समाजाचे फलित आहे. परात्मतेच्या बाबतीत मार्क्सने जी चूक केली तीच तो येथे करीत आहे. परात्मता हे क्रयवस्तूवर आधारलेल्या भांडवलशाहीचे जितके फलित आहे त्याहूनही अधिक ते उद्योगीकरणाचे फलित आहे. मार्क्स असा घोटाळा करतो कारण अशा प्रश्नांत गुंतलेल्या प्रश्नांचा कसून तात्त्विक शोध तो घेत नाही. क्रयवस्तूकरणामुळे अमूर्तता येते, भांडवली नीतीत एक अमूर्तता येते. घाल दोघांची गाठ, असा त्याचा विस्तार चालतो. पण नीती हे एक व्यामिश्र प्रकरण आहे, या व्यामिश्रतेचे मूळ मानवी संबंधांच्या व्यामिश्रतेत आहे, केवळ सामाजिक संबंधांचा शोध घेऊन नीतीच्या व्यामिश्रतेचा छडा लागणार नाही, माणूस हा जसा सामाजिक प्राणी आहे तसाच तो अहंभाव जपणाराही प्राणी आहे, त्याचे सामाजिक जीवन जितके सहकार्यावर आधारलेले असते तितकेच ते स्पर्धेवरही आधारलेले असते, त्याची नीती हा समाजाला जितका प्रतिसाद असतो तितकीच ती आत्म्याची प्रेरणा असते– या सर्व गोष्टींचा ख्याल राखल्याखेरीज नीतीच्या व्यामिश्रतेतून वाट काढणे शक्यच नाही.

(अपूर्ण)

अनुक्रमणिका






बा. वि. मिराशी

# माहिषक देशाचे भौगोलिक स्थान

[ शालिवाहन संवत् ( ज्याला आता राष्ट्रीय संवताचा मान मिळाला आहे तो ) वस्तुतः कुषाणवंशी सम्राट कनिष्काने स्थापलेला. महाराष्ट्र व गुजराथ–माळवा प्रदेशांतील त्याच्या शक क्षत्रपांनी कालनिर्देशार्थ त्याचा उपयोग केल्यामुळे त्याला 'शक संवत्' हे नाव पडले. महाराष्ट्रात नहपान क्षत्रपाच्या कारकीर्दीतील याचे ४६ ( ई. स. १२४–२५ ) हे वर्ष शेवटचे. नंतर तो महाराष्ट्रातून नाहीसा झाला आणि ई. स. च्या सातव्या शतकात पुनः प्रचलित झाला तो आतापर्यंत टिकून आहे. मध्यंतरीच्या काळात तो कोठे चालू होता व पुनः महाराष्ट्रात कोठून आला याचे कोडे प्रस्तुत लेखात सोडविले आहे. प्रस्तुत लेख वा. वि. मिराशी यांच्या 'संशोधनमुक्तावलि : सर ९' या आगामी ग्रंथातून त्यांच्या अनुमतीनें येथे दिला आहे.—का. सं. ]

---

'महाभारता' च्या अनेक पर्वांत, 'रामायणात', 'वायुपुराणा'सारख्या काही पुराणांत, तसेच 'महावंस' आणि 'दीपवंस' या श्रीलंकेच्या पालि-ग्रंथांत माहिषक किंवा महिषमण्डल या देशाचे उल्लेख आढळतात. पण तो देश नक्की कोठे होता याविषयी विद्वानांमध्ये मतैक्य नाही. तीस–पस्तीस वर्षांपूर्वी हैदराबादचे आमचे स्नेही श्री. हुरमुझ कौस यांनी आम्हांस प्रकाशनाकरिता पाठविलेल्या काही नाण्यांच्या छापांचा अभ्यास करीत असताना आम्हांस या देशाच्या स्थानाची चर्चा करावी लागली होती. त्या वेळी काही अभ्यासकांनी आमच्या एतद्विषयक मतावर आक्षेप घेऊन आपले निराळे मत प्रतिपादिले होते. सुदैवाने या प्रश्नावर प्रकाश टाकणारा थोडा नवीन पुरावा अलीकडे प्राप्त झाला आहे. त्याच्या योगे या समस्येचा पुनः सविस्तर विचार येथे करावयाचा आहे.

माहिषक देशाच्या स्थानाविषयी एक गोष्ट सुस्पष्ट आहे. ती ही, की तो देश दक्षिणापथात म्हणजे नर्मदेच्या दक्षिणेस होता. राजशेखराने आपल्या 'काव्यमीमांसे'त दक्षिणापथातील जनपदांची म्हणजे देशांची लांबलचक नामावलि दिली आहे. तिच्या आरंभी महाराष्ट्र, माहिषक, अश्मक, विदर्भ व कुन्तल यांची नावे आहेत.[1] यांमध्ये माहिषकाचा महाराष्ट्र, अश्मक ( अहमदनगर–बीड जिल्हे ), विदर्भ व कुन्तल ( कर्नाटक ) यांच्यासहित उल्लेख आल्यामुळे तो देश त्यांच्या परिसरात होता असे सूचित होते. म्हणून माहिषक म्हणजे माहिष्मती ज्याची राजधानी होती तो देश असावा हे केंब्रिज हिस्टरी ऑफ इंडिया, व्हॉ. १ ( पृ. ६०३ ) मधील बार्नेटचे मत स्वीकारता येत नाही.[2] कारण माहिष्मती ही नर्मदेच्या उत्तर तीरावरच्या अनूप देशाची राजधानी होती. तो देश दक्षिणापथात नव्हता.

---

१. माहिष्मत्याः परतो दक्षिणापथः । यत्र महाराष्ट्रमाहिषकाश्मकविदर्भकुन्तल... प्रभृतयो जनपदाः । काव्यमीमांसा ( G. O. S. १९१० ) पृ. ३

२. ते मत फ्लीटच्या जे. रॉ. ए. सो. ( १९१० ) पृ. ४१९–४४७ यांवरील लेखावर आधारले होते. फ्लीटने या विषयाची चर्चा करून माहिषक देश म्हणजे मैसूर नव्हे असे दाखवून तो 'माहिष्मती राजधानी असलेला प्रदेश' असे प्रतिपादिले होते.

अनुक्रमणिका







'महावंस' (१२–३–२९) व 'दीपवंस' (८–१–२) या ग्रंथांत मोग्गलिपुत्त तिस्स याने बौद्ध धर्माच्या प्रसारार्थ दक्षिणेतील ज्या देशांमध्ये बौद्ध भिक्षु पाठविले होते त्यांमध्ये महाराष्ट्र, अपरान्त व वानवासक (उत्तर कानडा जिल्हा) यांच्या बरोबर महिषमंडलाचा उल्लेख आहे त्यावरून महिषमंडल हे माहिषकाचे दुसरे नांव होते असे दिसते. 'महिष जनाचा जो देश तो माहिषक' अशी त्याची व्युत्पत्ति आहे.

'महाभारत', 'रामायण' व पुराणे यांतील उल्लेखही माहिषक देश महाराष्ट्र, कलिङग आणि द्राविड या देशांना लागून होता असेच सुचवितात. पण या देशाचे नक्की स्थान ठरविण्यास हे उल्लेख पुरेसे नव्हते. त्याकरिता श्री. हुरमुझ कौस यांनी हैदराबादेत मिळविलेल्या नाण्यांचे आणि हैदराबाद म्युझियमचे क्यूरेटर के. एम्. अहमद यांनी पूर्वीच्या हैदराबाद संस्थानाच्या मेदक जिल्ह्यातील कोंडापूर येथे केलेल्या उत्खननात सापडलेल्या दुसऱ्या प्रकारच्या नाण्यांचे छाप आम्हांस सुमारे ३५ वर्षांपूर्वी पाठविले होते, त्यांची बहुमोल मदत झाली आहे.

हुरमुझ कौस यांनी पाठविलेल्या छापांपैकी एकावरील लेख[३] 'गमानमहस' असा आणि दुसऱ्यावरील लेख[४] 'रंञो सगमान [म]' असा होता. ही दोन्ही नाणी तांब्याची व एकाच प्रकारची होती. दोन्हींच्या पुढील बाजूवर सोंड वर केलेला हत्ती व त्याच्या मागील पायाजवळ आरंभ असलेला पूर्वोक्त लेख आणि मागील बाजूवर दोन डंबेल्स एकावर एक आडवे-उभे ठेवून झालेले उज्जैनी चिन्ह होते. या दोन नाण्यांवरील खंडित लेख एकत्र केल्यावर त्यांवरील संपूर्ण लेख 'रंञो सगमानमहसस' असा झाला. त्याचा अर्थ '[हे नाणे] राजा शक मान महिषाचे' असा आम्ही केला. हा अर्थ लावण्यात पुराणांतील खालील पंक्तीची आम्हांस बहुमोल मदत झाली[५]—

शक्यमानाभवद्राजा महिषीणां महीपतिः ।

ही पंक्ती अशुद्ध होती, म्हणून तिचा अर्थ लागत नव्हता. पार्गिटरने तिचे भाषांतर 'शक्यमान हा महिषींचा राजा होता' असे केले होते,[६] पण त्याचा अर्थ त्यालाही लागत नव्हता; कारण कोणीही व्यक्ति महिषींचा (पट्टराण्यांचा) राजा कसा असेल? वरील दोन नाण्यांच्या मदतीने आम्ही ती पंक्ति 'शकमानोभवद्राजा महिषाणां महीपतिः ।' अशी दुरुस्त केली. तेव्हा तिचा अर्थ सुस्पष्ट झाला. तो असा– 'शकवंशी मान हा महिष देशाचा राजा होता.' संस्कृतात देशांची नावे अनेक वचनात घालण्याचा प्रघात आहे. तदनुसार 'महिषाणां' हे पद योजले आहे. हा महिष देश म्हणजे ज्याचे 'महावंस' व 'दीपवंस' ग्रंथांत 'महिषमंडल' असे नाव येते तो देश होय. पुराणांवरून समजते, की पूर्वी त्यावर राज्य करणाऱ्या राजाचे नाव 'मान' असे होते. तेच पूर्वोक्त नाण्यांवरील लेखात आले आहे.

नंतर हा मान राजा केव्हा होऊन गेला आणि त्याचा दक्षिणेतील इतर राजांशी संबंध आला होता काय, असे प्रश्न उपस्थित झाले. श्री अहमद यांनी कोंडापूर येथे उत्खननात सापडलेल्या काही शिशाच्या वाटोळ्या मोठ्या नाण्यांचे छाप आम्हांस पाठवले, त्यांवरून वरील प्रश्नांवर महत्त्वाचा प्रकाश पडला. या नाण्यांच्या पुढील बाजूवर स्वस्तिक चिन्ह होते. काहींच्या मागील बाजूवर पूर्वोक्त उज्जैनी चिन्ह आणि इतरांच्या त्या बाजूवर वज्र आणि खाली टोक केलेला बाण यांची चिन्हे होती. एका नाण्यावरील लेख विस्तृत आणि सुस्पष्ट होता. त्याचे वाचन 'महासेनापतिस भरदजपुतस सगमानचुटुकुलस' (हे नाणे महासेनापति भरद्वाजपुत्र शक मान चुटुकुल याचे) असे करता आले.[७] सामान्यतः नाण्यांवरील लेखांत स्वरचिन्हे गाळलेली असतात, पण या नाण्यावरील लेखात ती सुस्पष्ट होती.[८]

३. आकृती १ पाहा.
४. आकृती २ पाहा.
५. पार्गीटर, डायनॅस्टीज ऑफ कालएज (डा. क. ए) प. ३१
६. पूर्वोक्त, पृ. ७३
७. आकृति ३ पाहा.
८. डॉ. सरकारांनी 'भरद्वाजीपुत्र' असे सुचविले आहे, पण 'ज' वर इकाराचे चिन्ह नाही.

या नाण्यांवरून पूर्वोक्त शक राजा मान याच्याविषयी बरीच महत्त्वाची माहिती मिळाली. काही शक राजांच्या लेखांत त्यांच्या पित्यांच्या नावाचा निर्देश असतो. उदाहरणार्थ, कानाखेडा व एरण येथे सापडलेल्या महाक्षत्रप शक श्रीधरवर्म्याच्या लेखात त्याचा पिता शक नंद याचा निर्देश आहे. तसा या शक मान सेनापतीच्या नाण्यांवर त्याचा पिता भरद्वाज याचा आहे. त्यावरून त्या काळी हे परकी शक भारतीय संस्कृतीत मिसळून गेले होते असे स्पष्ट दिसते. दुसरी गोष्ट ही, की या शिशाच्या नाण्यांवर त्या शक राजाची 'महासेनापति' ही पदवी उल्लेखिली आहे. हुरमुझ कौस यांना मिळालेल्या नाण्यांवर त्याची पदवी 'राजन्' अशी दिली होती. बहुधा हा शकवंशी मान आरंभी एखाद्या राजाचा बलाढ्य महासेनापति असून नंतर सातवाहनांच्या काही महारठी मांडलिकांप्रमाणे स्वतःची नाणी पाडण्याचा अधिकार गाजवीत होता. कालान्तराने स्वतंत्र झाल्यावर त्याने 'राजा' अशी पदवी धारण केली असावी.

या तांब्याच्या व शिशाच्या नाण्यांवरील लेखांची अक्षरवटिका ख्रिस्तोत्तर दुसऱ्या–तिसऱ्या शतकांतील आहे. तेव्हा हा शक मान राजा सातवाहन कालाच्या शेवटी होऊन गेला असावा. त्याच्या शिशाच्या नाण्यांच्या मागील बाजूवरील वज्र व बाण या चिन्हांवरून हे अनुमान समर्थित होते. प्राचीन भारतीय नाणकशास्त्रात ही चिन्हे फक्त शक क्षत्रप भूमक व नहपान यांच्या नाण्यांवर आढळतात.[९] ती दुसऱ्या कोणाही देशी वा विदेशी अधिपतीच्या नाण्यांवर आतापर्यंत आढळली नाहीत.

कोरीव लेख व नाणी यांवरून महाराष्ट्राचा जो प्राचीन इतिहास आता ज्ञात झाला आहे त्यावरून असे दिसते, की ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाच्या दुसऱ्या पादात (सुमारे सन १२५–१२६ मध्ये) गौतमीपुत्र सातकर्णीने नाशिकजवळ गोवर्धन आणि पुणे जिल्ह्यातील कार्ले येथे झालेल्या दोन घनघोर युद्धांत शकवंशी महाक्षत्रप नहपान याच्या क्षहरात वंशाचा समूळ उच्छेद केला होता. नाशिकच्या क्र. ३ च्या लेण्यातील लेखात गौतमीपुत्र सातकर्णीचे वर्णन 'खखरातवसनिरवसेसकर' (क्षहरात वंशाचा पूर्णपणे संहार करणारा) असे आले आहे.[१०] तरीही या युद्धातून मान नामक एक शूर शक निसटलेला दिसतो. त्याने दक्षिणेत जाऊन कालान्तराने आपली सत्ता स्थापिली. आरंभी त्याने 'महासेनापति' ही पदवी धारण केली आणि तत्कालीन कोणा सम्राटाचे (बहुधा एखाद्या उत्तरकालीन सातवाहनाचे) वरकरणी स्वामित्व मान्य केलेले दिसते, पण नंतर त्याने ते झुगारून देऊन सातवाहनांच्या सारखीच हस्तिचिन्हांकित तांब्याची नाणी पाडण्यास सुरवात केली. हुरमुस कौस यांना मिळालेली नाणी याप्रकारची आहेत.

शकवंशी मान हा आपल्या तांब्याच्या नाण्यांवरील लेखात आपला उल्लेख 'महिष' असा असा करतो. त्यावरून तो महिषमंडलावर (किंवा माहिषक देशावर) राज्य करीत होता हे स्पष्ट दिसते. त्याची नाणी उत्खननात पूर्वीच्या हैदराबाद संस्थानाच्या दक्षिणेस मेदक जिल्ह्यातील कोंडापूर आणि रायचूर जिल्ह्यातील मस्की येथे सापडली आहेत.[११] तेव्हा हा प्रदेश त्याच्या अमलाखाली होता आणि तो महिषमंडलात किंवा माहिषक देशात मोडत होता असे अनुमान करता येते. माहिषक देशाचे हे भौगोलिक स्थान आम्ही तीस-पस्तीस वर्षांपूर्वी आपल्या लेखात प्रतिपादिले होते.[१२]

कोंडापूर येथे उत्खननात सापडलेल्या शिशाच्या वाटोळ्या मोठ्या आकाराच्या नाण्यांवर या शकवंशी मान राजाचे चुटुकुल असे आणखी एक विशेषण योजिले आहे. इतर काही नाण्यांवर त्याचे संक्षिप्त रूप 'चुटुक' असे आले आहे.[१३] या विशे-

---

९. रॅप्सननच्या अन्ध्रवगैरेंच्या नाण्यांचा कॅटलॉग, पृ. ६३ व ६५ पाहा.

१०. आमचा ग्रंथ 'सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप' यांचा 'इतिहास आणि कोरीव लेख' (सा. प. क्ष. इ. को. ले.), भाग २, पाहा.

११. मिराशी, स्टडीज इन इंडॉलॉजी, व्हॉ. ३, पृ. ६७ इ. आणि ७२ इ. पाहा.

१२. पूर्वोक्त, पृ. ५६ इ.

१३. पूर्वोक्त, पृ. ६२ इ.

षणाच्या योगे त्याचा संबंध कर्नाटकातील चुटुकुलानंद राजांशी जोडता येतो. त्याची चर्चा पुढे करू.

हा मान राजा प्राचीन काली बलाढच आणि सुप्रसिद्ध होता असे दिसते. पुराणांत ज्या थोडचा प्राचीन ऐतिहासिक राजांचा उल्लेख आला आहे, त्यांपैकी तो एक आहे. हैदराबाद संस्थानाच्या दक्षिण भागात त्यांच्याप्रमाणे त्याच्या काही वंशजांची-शिवल व यश महिष यांची-नाणी सापडली आहेत. त्याचे किंवा त्याच्या या किंवा इतर वंशजांचे कोरीव लेख मात्र अद्यापि या भागात किंवा इतरत्र कोठेही मिळाले नाहीत. भावी संशोधनाने ते मिळतील अशी आशा आपण करू या.

हुरमुस कौस आणि अहमद यांनी पाठविलेल्या नाण्यांच्या छापावरील आमचे लेख न्यूमिस्मॅटिक सोसायटीचे जर्नल व इतर काही संशोधनकालिके यांत प्रसिद्ध झाल्यावर दिनेशचंद्र सरकार यांनी आपल्या स्वभावास अनुसरून त्यांवर टीकेची झोड उठविण्यास आरंभ केला. एपिग्राफिया इंडिका हे कालिक त्याच्या नावाप्रमाणे कोरीव लेखांच्या प्रकाशनास वाहिलेले असते. त्यात नाण्यांवरील लेख प्रसिद्ध होत नसतात, पण आमच्यावर अनुग्रह करून डॉ. सरकारांनी त्यात या नाण्यांवरील आपला लेख स्वतः संपादक असता प्रकाशित केला.[१३] त्यात त्यांनी सत्याला अनुसरून विधायक टीका केली असती तर कोणीही आक्षेप घेतला नसता. पण त्यात मुद्दाम वेड पांघरून त्यांनी आमच्या प्रतिपादनावर बिनबुडाचे आक्षेप घेतले आहेत. आम्ही ते आक्षेप एपिग्राफिआ इंडिकाच्या नंतरच्या एका अंकात सविस्तर खोडून काढले आहेत.[१४] ते सर्व विवेचन येथे देणे शक्य नाही. वानगीदाखल एक-दोन आक्षेप देऊन त्यांचा फोलपणा दाखवितो.

यासोबत शकवंशी मानराजाच्या तीन नाण्यांचे फोटो दिले आहेत. (प्लेट पाहा) क्र.१ व क्र. २ ही नाणी तांब्याची, चौकोनी, लहान आकाराची व



आकृति १ – मान महिषाचे तांब्याचे नाणे. लेख – 'रञो सगमान ( म )–'.

आकृति २ – मान महिषाचे तांब्याचे नाणे. लेख – 'सगमानमह –'.

हस्तिचिन्हांकित आहेत. त्यांच्या पुढील भागावरील लेख मोठचा अक्षरांत असून त्याचा आरंभ डाव्या बाजूच्या खालच्या कोनात हत्तीच्या मागील पायांजवळ, आणि त्याचा शेवट उजव्या बाजूच्या वरील कोनात हत्तीच्या सोंडेच्या अग्राजवळ होते. या नाण्यांवरील लेखाची ही पद्धत सातवाहनांच्या तऱ्हाळे संचयातील नाण्यांवरील लेखांच्या सारखी आहे. त्यावरील चिन्हही सोंड वर केलेला हत्ती हेच आहे.[१५] त्या लेखातील एकंदर अक्षरे दहा असावी. ती सर्व एका नाण्यावर आढळत नाहीत. आरंभीची

---

१४. एपिग्राफिआ इंडिका ( ए. इ ) व्हॉ. ३७, पृ. ३४ इ.

१५. स्ट. इं., व्हॉ. ३, पृ ३४ इ.

काही क्र. १ च्या नाण्यावर व शेवटची काही क्र. २ च्या नाण्यावर आली आहेत. हे दोन्ही भाग एकत्र केल्यावर या प्रकारच्या नाण्यांवरील संपूर्ण लेख 'रञो सगमानमहस [स*]' असा होतो. या लेखाची अक्षरे इतकी मोठी आहेत, की यांपेक्षा जास्त अक्षरे या प्रकारच्या नाण्यांवर असणे सुतराम् असंभवनीय आहे.

यावर डॉ. दिनेशचंद्र सरकारनी पुढील आक्षेप घेतले आहेत[१६] :– (१) या नाण्यांवरील आरंभीची हत्तीच्या मागील पायांजवळची जी अक्षरे आम्ही 'रञो' अशी वाचली ही वस्तुतः अक्षरे नसून तेथे सहा टेकड्यांच्या पर्वताचे चिन्ह आहे, आणि (२) या प्रकारच्या नाण्यांवरील पूर्ण लेख 'सगमानमहासेनापतिस चुटुकुलस' असा असावा. त्याचा अर्थ 'हे नाणे सगमांच्या महासेनापति चुटुकुलाचे' असा आहे. तेव्हा ही नाणी आम्ही म्हणतो त्याप्रमाणे शकवंशी राजा मान महिष याची नसून 'सगमांचा महासेनापति चुटुकुल' याची आहेत.

आता डॉ. सरकारांच्या वरील दोन आक्षेपांचे चिकित्सकपणे परीक्षण करू.

**आक्षेप पहिला**— हत्तीच्या मागील पायाजवळ 'रञो' अशी अक्षरे नसून सहा टेकड्यांचा पर्वत आहे.

**परीक्षण**— ही तांब्याची क्र १ व २ ची नाणी त्यापूर्वीच्या सातवाहनांच्या हस्तिचिन्हांकित नाण्यांच्या अनुकरणाने बनविली आहेत. अशी शेकडो नाणी तऱ्हाळे संचयात होती. त्यांचे वर्णन आम्ही प्रकाशित केले आहे.[१७] त्यांवरील लेखाचा आरंभ 'रणो' (राजाचे) या शब्दाने झाला आहे. इतरत्र त्याचे 'रञो' असे रूप आढळते. येथील क्र. १ च्या नाण्याचे सूक्ष्म परीक्षण केल्यास तेथे यावरही तोच 'रञो' शब्द आढळेल. या ठिकाणी सहा टेकड्यांचे चिन्ह कोणत्याही नाण्यावर आढळणार नाही. ते चिन्ह नाण्याच्या मध्यभागी बहुधा नाण्यांच्या मागील बाजूवर आढळते.

**आक्षेप दुसरा**—या नाण्यांवरील पूर्ण लेख 'सगमानमहासेनापतिस चुटुकुलस' असावा आणि त्याचा अर्थ 'हे नाणे सगमांच्या महासेनापति चुटुकुल याचे' असा असावा.

**परीक्षण**— डॉ. सरकारनी कल्पिलेल्या पूर्ण लेखाच्या अक्षरांपैकी 'सगमानमहस' एवढीच सात अक्षरे या दोन नाण्यांवर मिळून दिसतात. बाकीची अक्षरे डॉ. सरकारनी क्र. ३ च्या नाण्यावरील लेखातून घेतली आहेत. पण ते नाणे भिन्न प्रकारचे आहे. त्याचा आकार वाटोळा आणि मोठा असून त्यावरचा लेख मधल्या स्वस्तिकाच्या सभोवार कोरला आहे. क्र. १ व क्र. २ ची नाणी चौकोनी व लहान आकाराची असून त्यांवरील लेख हस्तिचिन्हाच्या फक्त मागील व वरील बाजूवर आहे, पुढील व खालील बाजूवर नाही. शिवाय ती अक्षरे मोठ्या आकाराची आहेत. त्या बाजूवरील लेख या आकाराच्या सोळा अक्षरांचा असणे मुळीच शक्य नाही.

ही झाली या तांब्याच्या चौकोनी नाण्यांवरील लेखाच्या वाचनाची कथा! आता त्या वाचनाच्या अर्थाचे परीक्षण करू.

डॉ. सरकार म्हणतात 'सगमानमहासेनापतिस चुटुकुलस' हा शब्दप्रयोग पल्लवांच्या ताम्रपटांत आढळणाऱ्या 'पल्लवाण सिवखंदवमो' यासारखा आहे.[१८] पण (१) असे षष्ठचन्त वंशनामाचे प्रयोग ताम्रपटादिकांत–ज्या ठिकाणी जागेची कमतरता नसते तेथे–येतात. नाण्यांवर ते कोठेही आढळत नाहीत. 'खखरातान', 'गुप्तानाम्' यासारखे प्रयोग क्षहरातांच्या व गुप्तांच्या नाण्यांवरील लेखांत कोठे आढळले आहेत काय? नाण्यांवरील लेखांत वंशाचा उल्लेख करावयाचा असल्यास तो व्यक्तिनामाच्या शेवटी एकवचनात येतो–असे 'सिमुक सातवाहनस,' 'गोतमिपुतस सिरियञसातकणिस'. (२) दुसरे असे, की 'राजन्', 'महासेनापति' या पदव्या वंशनामापूर्वी येतात, येथल्याप्रमाणे नंतर येत नाहीत. (३) तिसरे हे, की 'सगम' नावाचा वंश कोठेही उल्लेखिला नाही.

---

१६. ए. इ. व्हॉ. ३५, पृ ६९ इ.
१७. स्ट. इं, व्हॉ. ३, पृ ३४ इ.
१८. ए. इं. व्हॉ. १, पृ. ५ इ.

तेव्हा तो डॉ. सरकारनी प्रस्तुत वादाकरिता केवळ कल्पिलेला आहे. (४) शिवाय चुटुकुल हे व्यक्तिनाम नसून कुलनाम आहे, हे सुस्पष्ट आहे, त्यावरून बनलेले व्यक्तिनाम 'चुटुकुलानंद' नाण्यांवर आढळते ते पाहा.[१९] आणखी असे, की या वाचनाने क्र. ३ वरच्या वज्र व खाली टोक केलेला बाण या चिन्हांवर कोणताच प्रकाश पडत नाही. याच्या उलट आमच्या वाचनात व अर्थात त्यांची सम्यक् उपपत्ति दाखविली आहे आणि ते वाचन पुराणांतील शकवंशी मान महिष राजाच्या वर्णनाने समर्थित होते हेही सिद्ध केले आहे.

तेव्हा क्र. १ व २ या चौकोनी हस्तिचिन्हांकित तांब्याच्या नाण्यांवरील पूर्ण लेख 'रंञो सगमानमहसस' (हे नाणे राजा शक मान महिषाचे) आणि क्र. ३ च्या स्वस्तिकचिन्हांकित शिशाच्या नाण्यांवरील पूर्ण लेख 'महासेनापतिस भरदजपुतस सगमानचुटुकुलस' (हे नाणे महासेनापति शकवंशी भरद्वाजपुत्र मानचुटुकुल याचे) असा आहे याविषयी कोणासही संशय राहू नये.





आकृति ३ – मान महिषाचे शिशाचे नाणे.
लेख – 'महासेनापतिस भरदजपुतस सगमानचुटुकुलस'

या नाण्यांचे वरील वाचन व त्याचा अर्थ इतका सुस्पष्ट असताना डॉ. दिनेशचंद्र सरकारसारख्या प्राचीनभारतीय लिपिविशारदास तो का मान्य होऊ नये, त्यांनी मुद्दाम वेड पांघरून 'सगम' सारख्या सर्वस्वी अज्ञात अशा राजवंशाची आणि चुटुकुलासारख्या असंभवनीय व्यक्तिनामाची कल्पना का करावी याचे वाचकांना कोडे पडले असेल. त्याचे कारण डॉ. सरकारांच्या स्वभावात सापडेल. आम्ही इतरत्र[२०] म्हटल्याप्रमाणे, 'डॉ. सरकार यांची विद्वत्ता मोठी आणि व्यासंग खोल असला तरी त्यांच्या स्वभावात खऱ्या संशोधनाला विरोधी असा एक दोष आहे. कोणी काही मौलिक संशोधन करून महत्त्वाची ऐतिहासिक साधने प्रकाशित केली, किंवा एखादा मौलिक सिद्धान्त प्रस्थापित केला तर त्याचे गुणग्रहण न करता हटवादीपणाने त्यातील काल्पनिक दोष दाखविण्याकडे त्यांची प्रवृत्ति असते.' प्रस्तुत विषयाच्या विवेचनावरून याची प्रतीति वाचकांस आली असेल.

तेव्हा शकवंशी मान महिष राजाची नाणी पूर्वीच्या हैदराबाद संस्थानच्या दक्षिण भागी मेदक जिल्ह्यात कोंडापूर येथे आणि रायचूर जिल्ह्यात मस्की येथे जमिनीवर किंवा उत्खननात प्राप्त झाली आहेत आणि तो राजा आपणास महिष (महिष देशाचा वा मंडलाचा राजा) म्हणवतो, म्हणून पूर्वीच्या हैदराबाद संस्थानच्या दक्षिण भागात असलेल्या माहिषक देशात पूर्वोक्त प्रदेश अंतर्भूत होते असे अनुमान करता येते.

आता माहिषक देशाच्या पूर्वोक्त भौगोलिक स्थानाचा उपोद्बलक पुरावा अलीकडे उपलब्ध झाला आहे तो पुढे मांडतो.

अशोकाने कलिंग देश जिंकला होता त्या देशावरील स्वारीत झालेल्या भयंकर प्राणहानीने त्याला उपरति होऊन त्याने बौद्ध धर्माचा स्वीकार केला.

---

१९. रॅप्सनचा आंध्र इ. नाण्यांचा कॅटलॉग, प्रस्तावना, पृ. ४३, ८४.

२०. सं. मु., सर ८, पृ. १४२.

त्याने तेथील अधिकाऱ्यांना उद्देशून दोन निराळे प्रस्तर आदेश काढले होते. त्यात त्यांनी प्रजाजनांशी कसे वागावे याचे विवरण केले होते. हे आदेश ओरिसाच्या पुरी जिल्ह्यात धौलि येथे आणि गंजाम जिल्ह्यात जौगडा येथे खडकावर कोरले आहेत. हा सर्व प्रदेश कलिंग देशात मोडत होता हे स्पष्ट आहे. वास्तविक पुरी जिल्ह्याचा अंतर्भाव उत्कलात आणि गंजाम जिल्ह्याचा कलिंगात होत असे. कालिदासाने रघुवंशात ( ४.३८ ) वर्णिले आहे, की वंगाधिपतीचा उच्छेद केल्यावर उत्कलाच्या ( ओरिसाच्या ) राजाने दाखविलेल्या मार्गाने रघु कलिंगावर चालून गेला. तेव्हा वंग, उत्कल, कलिंग व आंध्र हे देश या क्रमाने भारताच्या पूर्व दिशेस एकाच्या दक्षिणेस एक असे होते. पण असे असले तरी उत्कलाचा उल्लेख फारसा आढळत नाही. तो प्रदेश कलिंगातच मोडत होता. खारवेलाने 'कलिंगाधिपति' आणि 'कलिंगचक्रवर्ती' अशा पदव्या धारण केल्या होत्या. त्याचा विस्तृत लेख भुवनेश्वरजवळ हाथीगुंफा लेण्यात कोरला आहे. जवळच्या दुसऱ्या एका लेण्यात त्याच्या राणीचा लेख आहे. तेथे दुसऱ्या एका वकदेव ( वक्रदेव ) नामक कलिंगाधिपतीचा लेख आहे. हे राजे आपणास 'महामेघवाहन' असे म्हणतात. महामेघवाहन हे त्यांच्या मूळ वंशपुरुषाचे नाव असावे[२१]. त्याने पश्चिमेच्या सातवाहन राजाप्रमाणे अशोकाच्या निधनानंतर उदयास येऊन कलिंगातून मौर्यांना हाकून लावून आपल्या राज्याची स्थापना केली असावी. त्याच्यानंतर वकदेवसारखे एक दोन राजे होऊन गेल्यावर खारवेल हा बलाढ्य राजा उदयास आला. त्याचा अंमल उत्तरेस ओरिसा देशापासून दक्षिणेस आंध्रच्या दक्षिण सीमेपर्यंत अप्रतिहत होता असे त्याच्या हाथीगुंफा लेखावरून दिसते. त्याची राजधानी कलिंगनगर ही भुवनेश्वरजवळच असावी, कारण तेथे त्याचे, त्याच्या राणीचे आणि वंशजांचे लेख सापडले आहेत. काही विद्वान कलिंगनगर म्हणजे आंध्रातले मुखलिंगम् मानतात पण त्याला प्रमाण नाही.[२२]

दहा–बारा वर्षांपूर्वीपर्यंत खारवेलाचे किंवा त्याच्या वंशीयाचे लेख पुरी जिल्ह्याहून इतरत्र सापडले नव्हते. पण अलीकडे आंध्राच्या पश्चिम गोदावरी जिल्ह्यातील कामवरपुकोटपासून सहा मैलावर गुंटुपल्ली येथे चार खांबावर एकच लेख चार प्रतीत कोरलेला आढळला आहे. तो डॉ. आर. सुब्रह्मण्यम् यांनी सन १९६८ मध्ये आंध्रप्रदेशाच्या एपिग्राफिकल मालेचे तिसरे पुष्प म्हणून प्रसिद्ध केला आहे. चारी खांबावर त्याचे वाचन एकच आहे. ते खाली दिले आहे–

ओळ
१ महाराजस कलिंग–
२ माहिसकाधिपतिस म–
३ हामेखवाहनस
४ सिरिसदस लेख–
५ कस चुलगोमस मंड–
६ पो दानं [ ।* ]

याचा अर्थ त्यानी '( हा ) मंडप महाराज, कलिंग–माहिषकाधिपति महामेघवाहन याचा संदेश–लेखक श्री चुलगोम याचे दान' असा केला होता. असा अर्थ करताना त्यांनी 'सदसलेखकस' हे सामासिक पद घेऊन त्याचा अर्थ 'संदेशलेखक' असा केला होता. तो बरोबर नव्हता. कोणाही प्राचीन राजाने

२१. मेघवाहन म्हणजे इंद्र. महामेघवाहन हे नाव 'महेन्द्रा'सारखे आहे. एका ठिकाणी माहामेघवाहन' असे या बिरुदाचे रूप आढळते. त्याचा अर्थ 'महामेघवाहनाचा वंशज' असा आहे.

२२. कलिंगाची राजधानी भुवनेश्वरजवळ असल्यामुळे त्याची सेना पश्चिमेस जाऊन कण्हवेण्णा ( वैनगंगा नदीला ) पोचली. तेथे सातकर्णीचा अंमल होता हे आम्ही दाखविले आहे. खारवेलाची राजधानी गंजाम जिल्ह्यात मुखलिंगम् येथे मानल्यास हे वर्णन जुळणार नाही. तसेच कण्हवेण्णा ही काही विद्वान् म्हणतात त्याप्रमाणे कृष्णा नदी होऊ शकत नाही. ती मुखलिंगम्च्याही पश्चिमेस वाहत नाही, दक्षिणेस वाहते. तेव्हा खारवेलाची राजधानी भुवनेश्वरजवळच मानली पाहिजे.

केवळ आपल्या संदेशलेखनाकरिता लेखक ठेवल्याचा कोठेही उल्लेख नाही. शिवाय असा अर्थ करण्यात 'सिरि' हे संमानदर्शक उपपद 'चुलगोमस' या व्यक्तिनामाला जोडले नसून त्या दोन पदांमध्ये 'सदसलेखकस' या पदाचे व्यवधान येते तसे इतरत्र कोठेही आढळत नाही, हा बलवत्तर आक्षेप या अन्वयार्थावर येतो. शिवाय, यात खारवेलाचे नाव येत नाही. त्यामुळे हा अर्थ स्वीकारता येत नाही. म्हणून डॉ. सरकार[२३] व डॉ. शंकरनारायणन्[२४] यांनी सुचविल्याप्रमाणे या लेखाचा अर्थ पुढीलप्रमाणे केला पाहिजे– 'हा मंडप महाराज, कलिंगमाहिषकाधिपति आणि महामेघवाहन श्री सद (सात) याचा लेखक चुलगोम याचे दान आहे.'

या अर्थामध्ये तत्कालीन राजाचे नाव सद (बहुधा संस्कृत सात) असे घेतले आहे. याचा सातवाहनाशी काही संबंध नाही.[२५] या राजाची तीन विरुदे या लेखात उल्लेखिली आहेत. तो खारवेलाप्रमाणे महामेघवाहनाचा वंशज असल्याने त्याने त्या वंशकर्त्याचे बिरुद आपल्या नावामागे लावले आहे. त्याच्या 'महाराज' आणि 'कलिंगाधिपति' या पदव्याही खारवेलाच्या सारख्याच आहेत. पण त्याने या लेखात 'माहिसकाधिपति' (माहिषकाधिपति) अशी आणखी एक पदवी धारण केली होती ती नवीन आहे. तीतील माहिषक देशाचा उल्लेख कोरीव लेखात प्रथमच आढळतो. त्याला आपल्या प्रस्तुत विषयाच्या दृष्टीने महत्त्व आहे.

सद आणि खारवेल यांचा कसा संबंध होता याविषयी भिन्न भिन्न मते प्रदर्शित झाली आहेत. डॉ. शंकर नारायणन्च्या मते सद हा खारवेलाचा पूर्वज होता. पण तसे असते तर त्याच्या काळानंतर महामेघवाहन वंशज पुरुषांनी त्याने जिंकलेला माहिषक देश गमावला होता आणि खारवेलाने उत्तर व दक्षिण भारतात अनेक दिग्विजय मिळविले तरी त्याला माहिषक देश पुनः जिंकता आला नाही असे मानावे लागेल. कारण, त्याने 'माहिषकाधिपति' पदवी धारण केली नव्हती. पण हे मत संभवनीय वाटत नाही. डॉ. सरकारनी म्हटल्याप्रमाणे सद हा खारवेलानंतर झाला असावा. खारवेलाने कलिंगदेशाच्या दक्षिणेस पीथुंड नगर उद्ध्वस्त केले होते आणि त्याच्या पलीकडे जाऊन त्रमिर (द्रविड) संघाचा पराजय केला होता, पण कलिंगाच्या पश्चिमेचा एखादा देश जिंकून तो त्याने आपल्या राज्यास जोडल्याचा उल्लेख त्याच्या हाथीगुंफा लेखात नाही. ते काम त्याच्यानंतरच्या महाराज सद याने केले. त्याने माहिषक देश जिंकून 'कलिंगाधिपति' या पदवीशिवाय 'माहिषकाधिपति' ही आणखी एक पदवी धारण केली होती. ती या गुंटुपल्ली लेखात उल्लेखिली आहे.

हा माहिषक देश कोठे होता याविषयी गुंटुपल्ली लेखांच्या अनेक संपादकांनी भिन्न भिन्न मते व्यक्त केली आहेत. त्या लेखांचे पहिले संपादक सुब्रह्मण्यम् यांनी माहिषक हा प्रदेश हैदराबाद संस्थानच्या दक्षिण भागात होता असे हे आमचे मत स्वीकारून त्या प्रदेशातील कोंडापूर हे खारवेलाच्या सैन्याने भयभीत केलेले मुसिक नगर होय असे प्रतिपादिले आहे. यात त्यांची दिशाभूल झाली आहे. गुंटुपल्लीलेख ते समजतात त्याप्रमाणे खारवेलाचे नसून त्याचा वंशज महाराज सद याचे आहेत. शिवाय हाथीगुंफा लेखात उल्लेखिलेले नगर 'मुसिकनगर' नसून 'असिकनगर' (ऋषीकनगर) होते ते खानदेशात होते हे आम्ही इतरत्र सिद्ध केले आहे. त्याचा माहिषकाशी काही संबंध नाही.

शकवंशी मान राजाच्या नाण्यांविषयी आमच्याशी डॉ. सरकारांचा वाद झाला होता तेव्हा त्यांनी माहिषक म्हणजे सध्याचा मैसूर प्रदेश असे मत ठोकून दिले होते. त्यानंतर हे गुंटुपल्ली लेख प्रसिद्ध झाले. त्यांवर लिहिताना डॉ. सरकारांनी त्यातील सद राजाच्या 'कलिंगमाहिषकाधिपति' या पदवी-

---

२३. जर्नल ऑफ एन्शंट इंडियन हिस्टरी (ज. ए. इ. हि.). व्हा. ३ पृ. ३०. इ.
२४. ओरिएंटल जर्नल, व्हॉ. १९, पृ. ५३ इ.
२५. सरकार आणि शंकरनारायणन् यांनी हा राजा सातवाहनाच्या कन्येपासून झाला असावा असे म्हणून त्याच्या नावाची उपपत्ति लावली आहे, पण हे सुताने स्वर्गास जाण्यासारखे आहे.

वरून असे अनुमान केले की माहिषक देश हा कलिंग देशाला लागून असावा.[२६] मागील वादविवाद लक्षात घेता त्यांनी त्या देशाच्या भौगोलिक स्थानाची चर्चा करणे अपेक्षित होते. पण ती त्यांनी केली नव्हती. फक्त तो देश कलिंगाला लागून असावा एवढेच म्हटले होते.[२७] पण हे विधान आमच्या मताला पोषक आहे, कारण पूर्वीच्या हैदराबाद संस्थानाचा दक्षिणभाग–ज्याच्या कोंडापूर गावातील उत्खननात माहिषकाधिपति शकवंशी मान राजाची नाणी सापडली आहेत हे आम्ही सिद्ध केले होते तो–गुंटुपल्लीच्या जवळच पश्चिमेला आहे हे त्यांच्या लक्षात आले असावे. म्हणून त्यांनी या बाबवीत मौन धारण केले होते. पण पुढे पालि जातक ग्रंथांच्या इंग्रजी भाषांतराच्या सूचीत[२८] त्यांना 'माहिषक' स्थलनामाला जुळणारा 'महिंसक' देशाचा उल्लेख आढळला असावा. जातक क्र. ५२४ मध्ये मगधाच्या राजाने राज्यत्याग करून आणि महिंसक राज्यातील चंदक पर्वताजवळच्या कण्णपेण्णा नदीच्या वळणाजवळ पर्णकुटिका बांधून तपश्चर्या करीत काल घालविल्याचे वर्णन त्यांना आढळले.[२९] त्यावरून त्यांना हवा तो उल्लेख मिळाल्याचा आनंद झाला असावा. म्हणून त्यानी कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या प्राचीन भारतीय इतिहास शाखेच्या एका सभेत जाहीर केले[३०] की माहिषक देश म्हणजे चांदा जिल्हा होय. कारण त्यातून कण्णपेण्णा (वैनगंगा) नदी वाहते. त्या जिल्ह्याचे चांदा हे नावही चंदक पर्वताशी जुळणारे आहे. तेव्हा गोदावरी जिल्ह्याला उत्तरेकडील लागून असलेला चांदा जिल्हा हाच पूर्वीचा माहिषक देश होय.[३१] या अभिनव सिद्धान्ताचे चिकित्सक परीक्षण केले पाहिजे.

जातक–कथांमध्ये सामान्यतः तक्षशिला, मगध, राजगृह, चित्रकूट वगैरे उत्तर भारतातील स्थलांचे उल्लेख आढळतात. दक्षिण भारतातील अंध्र, अस्सक (अश्मक) अशा देशांचे निर्देश फार क्वचित दिसतात. तेव्हा त्यांत माहिषक देशाचा निर्देश 'महिंसक' या रूपात असणे संभवनीय वाटत नाही. महिंसक देशाचा उल्लेख फक्त दोन जातककथांत (क्र. ५२४. संखपाल जातक, आणि क्र. ६३३, चुल्लहंस जातक, यांत) येतो. या दोन्ही कथा लक्षपूर्वक वाचल्यास त्यांतील महिंसक देश दक्षिण भारतातील माहिषक असणे शक्य नाही हे कोणाच्याही लक्षात येईल. या कथा येथे विस्ताराने देणे शक्य नाही. त्यांतील आवश्यक तेवढाच भाग देता येईल. तो असा–

**क्र. ५२४–संखपाल जातक**[३२]– एकदा बोधिसत्त्व मगधाच्या राजाचा पुत्र म्हणून जन्माला आला. तक्षशिलेत शिक्षण झाल्यावर राजाने त्याला गादी देऊन तो स्वतः तेथील बगीच्यात राहू लागला. पण तेथे त्याचा पुत्र वरचेवर येऊन भेटू लागल्यामुळे त्याच्या तपश्चर्येत व्यत्यय येऊ लागला. म्हणून त्याने महिंसक देशात चंदक पर्वताजवळ शंखफल सरोवरातून निघणाऱ्या कण्णपेण्णा नदीच्या वळणाजवळ पर्णकुटिका बांधून तेथे वास्तव्य केले. तेथे एक नागराजा येऊन त्याचा धर्मोपदेश ऐकू लागला. एकदा तेथेही बोधिसत्त्व त्याला भेटण्यास आला अशी कथा आली आहे. पुढील कथेशी आपणास कर्तव्य नाही. पण वर दिलेल्या प्रस्तावनेवरून त्या राजाची पर्णकुटिका मगधास नसली तरी जवळपासच्या प्रदेशात– जेथे बोधिसत्त्वाला आपल्या पित्याला भेटणे फार कठीण नव्हते अशा ठिकाणी–

२६ Mahishaka was a region abuttiog on Kalinga.' ज. ए. इं. हि. व्हा. १२, पृ. ३१ पण हा कोणता प्रदेश हे त्यांनी सांगितले नाही.

२७. पूर्वोक्त संदर्भ पाहा.

२८. जातक सूची भाग, पृ. २८

२९. जातक इं. भा. व्हॉ. ५ पृ. ६४

३०. ज. ए. इं. हि. व्हॉ. ६, पृ. ३०३, ३०४

३१. डॉ. सरकार म्हणतात त्याप्रमाणे चांदा जिल्हा पश्चिम गोदावरी जिल्ह्याला लागून उत्तरेस नसून त्या दोन मध्ये सध्याचा बस्तर जिल्हा येतो.

३२. जातक, (इं. भा.) व्हॉ. ५.

अनुक्रमणिका

होती असे अनुमान करता येते. ती मगधाच्या राजगृह या राजधानीपासून सहस्राधिक मैल दूर विदर्भाच्या चांदा जिल्ह्यात होती, असे येथे विवक्षित नाही हे स्पष्ट आहे. तेव्हा या जातकातील वर्णनावरून प्राचीन माहिषक देश म्हणजे सध्याचा चांदा जिल्हा होय हे सिद्ध होत नाही.

शिवाय, कण्णपेण्णा ही वैनगंगा (किंवा कण्हबेण्णा) असणे शक्य नाही. कारण वैनगंगा नदी या जातकात वर्णिल्याप्रमाणे एखाद्या सरोवरातून उगम पावत नाही. कण्णपेण्णा नदीचे नाव तेवढे घ्यायचे पण तिच्या वर्णनाकडे लक्ष द्यावयाचे नाही असे केल्यास 'अर्धजरतीय' हा दोष[३३] उत्पन्न होतो.

**जातक क्र. ५३३–चुल्लहंसजातक[३४]–**

यात चंदक पर्वत आणि कण्णपेण्णा नदी यांचा निर्देश नाही. फक्त महिंसक देशाचा उल्लेख आहे. तो तर पूर्वोक्त उल्लेखापेक्षा जास्त पोकळ आहे. त्यात एवढेच म्हटले आहे की महिंसक देशातील सकुल नामक नगरातील एका पुष्करणीत चित्रकूट पर्वताकडून सुवर्णहंस भक्ष्याच्या शोधात येत असत. पुढील कथेशी आपणास कर्तव्य नाही. पण वरील वर्णनावरून तो महिंसक देश चित्रकूट पर्वतापासून फार दूर नव्हता असेच कोणीही अनुमान करील. उत्तर प्रदेशातील प्रयागजवळचा चित्रकूट पर्वत सुप्रसिद्ध आहे.[३५] महिंसक देश त्याच्यापासून फार दूर नव्हता. अर्थात् तो हजारो मैलांवरचा दक्षिण भारतातील चांदा जिल्हा असणे शक्य नाही हे सूर्यप्रकाशाइतके सुस्पष्ट आहे.

शिवाय चांदा जिल्हा विदर्भात समाविष्ट होता. माहिषक देशात अंतर्भूत नव्हता. प्राचीन काळी विदर्भाची मर्यादा उत्तरेस नर्मदेपासून दक्षिणेस गोदावरीपर्यंत आणि पश्चिमेस ऋषीक (खानदेश) पासून पूर्वेस दक्षिण कोसलापर्यंत (हल्लीच्या छत्तीसगडपर्यंत) होती. या प्रदेशातच चांदा जिल्हा आहे. वाकाटकांचे विदर्भावर राज्य होते हे सुप्रसिद्ध आहे. त्यांचा लेख चांदा जिल्ह्यात सापडला आहे.[३६] तेव्हा तो प्रदेश विदर्भात समाविष्ट होता याविषयी तिळमात्र शंका नाही. याच्या उलट माहिषक देश विदर्भापासून भिन्न पण जवळच होता. हे अनेक उल्लेखांवरून समजते. 'रामायणा' त सुग्रीवाने सीतेचा शोध लावण्याकरिता वानरांना खालील देशांस जाण्यास सांगितले–

विदर्भानृषिकांश्चैव रम्यान्माहिषकानपि।[३७]

यामध्ये माहिषक देशाचा उल्लेख विदर्भाहून भिन्न असा केला आहे. 'वायुपुराणा' त दक्षिणेतील सुप्रसिद्ध देशांचा निर्देश खालीलप्रमाणे आला आहे–

अथापरे जनपदा दक्षिणापथवासिनः।
महाराष्ट्रा माहिषकाः कलिङ्गाश्चैव सर्वशः ॥[३८]

तेव्हा माहिषक हा कलिङ्ग, विदर्भ, महाराष्ट्र वगैरेंहून निराळा, पण त्यांपासून फार दूर नसलेला असा देश होताअसेच कोणीही म्हणेल. तो विदर्भातील चांदा जिल्हा असणे शक्य नाही.

शंकरनारायणांनी दुसरीच उपपत्ति सुचवली आहे. पुराणांतील 'कलिंगा महिषाश्चैव महेन्द्रनिलयाश्च ये।' या पंक्तीत माहिषक देशाचा उलेख कलिंगदेश आणि महेन्द्र पर्वताचा प्रदेश यांसहित केला आहे.[३९] महेन्द्र पर्वत ओरिसाचा गंजाम जिल्हा आणि अंध्राचा श्रीकाकुलम् (चिकॅकोल) जिल्हा यांच्या सीमेवर आहे. तेव्हा कलिंग, महेन्द्र आणि माहिषक असे

---

३३. 'कोंबडीचा अर्धा भाग अंडी घालील, अर्ध्याची सागुती करू असे म्हटल्यास जसा हा दोष होतो, तसा प्रकार येथे होईल.
३४. जातक (इं. भा.) व्हॉ. ५, पृ १७८ इ.
३५. आमचे 'मेघदूतातील रामगिरि अर्थात् रामटेक यातील पृ. ७१ इ. वरील चित्रकूट पर्वताच्या स्थानासंबंधी चर्चा पाहा.
३६. देवटेक येथील प्रथम रुद्रसेनाचा शिलालेख पाहा. वाकाटकनृपति आणि त्यांचा काल, पृ. १ इ. देवटेक चांदा जिल्ह्यात आहे.
३७. रामायण, किष्किन्धा काण्ड, सर्ग ४१, श्लो. १०
३८. वायुपुराण, अ. ४५, श्लो. १२५.
३९. डा. क. ए., पृ. ५४

अनुक्रमणिका

कलिंगाचे तीन प्रदेश होते. त्यांनाच पुढे त्रिकलिंग असे नाव पडले. अशी अभिनव उपपत्ति त्यांनी पुढे मांडली आहे. पण ती अग्राह्य आहे. माहिषकाचा अंतर्भाव कलिंगात होत असता तर महाराज सद याला ' कलिंगाधिपति ' शिवाय ' माहिषकाधिपति ' अशी दुसरी पदवी धारण करण्याची जरूरी वाटली नसती. आपल्या पूर्वजांप्रमाणे तो ' कलिंगाधिपति ' होताच. नंतर त्याने माहिषक देश जिंकला. तेव्हा त्याने त्या देशाचा अन्तर्भाव करण्याकरिता ' कलिंगमाहिषकाधिपति ' अशी जोड पदवी धारण केली हीच उपपत्ति संभवनीय आहे. माहिषक देश कलिंगदेशाहून निराळा पण त्या लगतचा असला पाहिजे. गुंटुपल्लि पश्चिम गोदावरी जिल्ह्यात आहे. या जिल्ह्याचा समावेश कलिंग देशात होत होता हे मागे दाखविले आहे. अंध्रातच पश्चिम गोदावरी जिल्ह्यालगतच्या कृष्णा जिल्ह्याच्या वायव्येस मेदक जिल्हा आहे. त्यातील कोंडापूर गावी महिषांचा ( अर्थात् माहिषक देशाचा ) अधिपति शकवंशी मान याची तांब्याची व शिशाची नाणी उत्खननात सापडली आहेत. त्या प्रदेशात इतरत्र आणि जवळच्या रायचूर जिल्ह्यातील मस्की येथेही महिष राजांची नाणी मिळाली आहेत. तेव्हा हाच प्रदेश पूर्वी माहिषक नावाने ज्ञात होता, याविषयी आता शंका राहू नये. इतर कोणत्याही प्रदेशाच्या बाबतीत असा पुरावा मिळाला नाही.

मान या महिष राजाने चुटुकुल असेही बिरुद धारण केले होते. काही नाण्यांवर ते चुटुक असेही आढळते.[४०] या मान राजाच्या यश महिष आणि शिवल महिष या वंशजांची नाणी हैदराबाद–मस्की या प्रदेशात सापडलेली आम्ही प्रसिद्ध केली आहेत.[४१] हे शक राजे नहपानाचे वंशज होते हे त्यांच्या नाण्यांच्या मागील बाजूवरील वज्र व बाण या चिन्हांवरून स्पष्ट आहे.[४२] नहपानाप्रमाणे तेही आपल्या लेखात शक संवताचा उपयोग करीत असावे. त्यांचे कोरीव लेख यापुढे सापडल्यास त्यांतील कालोल्लेख त्या संवताचे असतील असा आम्हांस भरवसा आहे. त्यांचे साम्राज्य दक्षिणेत पसरले असल्यामुळे त्या संवताचा प्रसार मेदक जिल्ह्याप्रमाणे जवळच्या रायचूर आणि विजापूर जिल्ह्यात झाला असावा. ई. स. च्या सहाव्या शतकात विजापूर जिल्ह्यातील बादामीचे चालुक्य प्रबल झाले तेव्हा त्यांनी आपल्या लेखांत त्याचा उपयोग केला. पुढे त्या वंशातील दुसऱ्या पुलकेशीने ई. स. ६१२च्या सुमारास महाराष्ट्र जिंकला तेव्हा तो कोंकण, महाराष्ट्र व विदर्भ यात प्रचलित झाला.

तेव्हा आंध्राचे मेदक व रायचूर जिल्हे आणि कर्नाटकचा विजापूर जिल्हा यांचा अंतर्भाव प्राचीन माहिषक देशात होत होता हे सिद्ध होते.

४०. स्ट. इं., व्हॉ. ३, पृ. ६२ इ.

४१. पूर्वोक्त, पृ. ७२ इ.

४२. ही नाणी डॉ. सरकार म्हणतात त्याप्रमाणे सगम वंशाच्या चुटुकुल राजाची असणे संभवनीय नाही हे मागे दाखवले आहे. त्याच्या नाण्यांवर वज्र व बाण ही चिन्हे का आहेत याची कोणतीही उपपत्ति डॉ. सरकारांनी दिली नाही. तसेच पुराणांतील ' शकमानो भवद्राजा महिषाणां महीपतिः । ' या श्लोकाचा अर्थही त्यांना लावता आला नाही.

अनुक्रमणिका

## ग्रंथ-परीक्षण

**'प्रदेश साकल्याचा'** – त्र्यं. वि. सरदेशमुख ; श्री विद्या प्रकाशन, पुणे, १९७९ ; पृ. २+१८४ ; किंमत २५ रुपये.

**सरदेशमुखांचा समीक्षा देश**

आजच्या मराठी समीक्षा वाङ्मयात काही स्पष्टपणे ध्यानात येणारे प्रदेश व प्रवृत्ती आहेत. बराच भाग सांकेतिक व प्रासंगिक समीक्षेचा आहे. त्यात पारंपरिक समीक्षादृष्टीबरोबर १९ व्या शतकापर्यंत प्रचलित असलेली काही पाश्चात्त्य समीक्षातत्त्वेही अधूनमधून अंतर्भूत केली जातात. शिवाय विसाव्या शतकातील आकारवादी समीक्षेचे पर्यायही अर्ध्याकच्च्या अवस्थेत या प्रवाहात येऊन मिसळतात. त्यामुळे मराठी समीक्षेची सुसंगत धारा पाहावयास मिळत नाही. असे असले तरी प्रतिष्ठित, शिस्तसंमत साहित्यिक वर्तुळात मान्यता असलेली एक समीक्षापद्धती आहे ती प्रामुख्याने आशयवादी असून पारंपरिक जीवनमूल्ये विचारात घेणारी आहे. साहित्याचे व समीक्षेचे क्षेत्र शुद्ध ठेवण्यासाठी सर्व जीवनसंदर्भांना अप्रस्तुत मानून कलाकृतीच्या रचनेत व आविष्कारपद्धतीतच कलेचे मूल्यसर्वस्व शोधणारी आधुनिक आकारवादी समीक्षा मराठीत परिचित असली तरी मोठ्या प्रमाणात स्थिर झालेली नाही. या समीक्षापद्धतीला ज्या मर्यादा पडतात त्यांची उकल अधिक स्पष्टपणे व तपशीलात जाऊन अलिकडे होत आहे. या बाबतीत एक स्थूल निष्कर्ष मान्य होत आहे तो असा की, साहित्यसमीक्षेची एकमेव अंतिम पद्धती नाही. भिन्न पद्धतींचा व दृष्टिकोणांचा अवलंब करणे हे साहित्याच्या यथार्थ आकलनासाठी व अधिकाधिक न्याय्य मूल्यमापनासाठी आवश्यक व इष्ट ठरते. भिन्न पद्धतींची गरज या कारणासाठी, की साहित्यकृतींचे जे विविध घटक असतात व निर्मिती प्रक्रियेची जी विविध अंगे असतात त्यांतील विशिष्ट घटकांचा व अंगांचा अधिक आस्थेवाईक अभ्यास भिन्न समीक्षापद्धतींत होऊ शकतो. वेगवेगळ्या घटकांना कालमानानुसार व रसिक प्रवृत्तीनुसार कमीअधीक प्रकाशझोत मिळत असतो.

प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुखांच्या समीक्षापद्धतीचा विचार या पार्श्वभूमीवर करता येतो. 'प्रदेश साकल्याचा' हे त्यांच्या समीक्षालेखांचे नवे पुस्तक. या अगोदर 'अंधारयात्रा' व 'गडकऱ्यांची संसार नाटके' ही त्यांची दोन समीक्षेची पुस्तके प्रसिद्ध झालेली आहेत. त्यांच्या पहिल्या दोन पुस्तकांची म्हणावी तशी ठळकपणे नोंद घेण्यात आली नाही. याची अनेक कारणे असू शकतात. अन्य कारणांप्रमाणे असेही एक कारण असण्याची शक्यता आहे, की मराठी समीक्षेत प्रा. सरदेशमुख तयार करीत असलेला विचार अजून तितका स्पष्ट झालेला नाही. आधुनिक मराठी कवितेतील सौंदर्यविव्हल दृष्टिकोण आणि गडकऱ्यांच्या नाटकातील मृत्यूच्या छायेने घेरलेली संसारदृष्टी यांचा संमिश्र संवेदनात्मक परामर्ष घेणारी समीक्षादृष्टी प्रा. सरदेशमुख तयार करीत होते. दृष्टी म्हणून मराठीत ती अभिनव होती व आहे; पण त्याचबरोबर ती मांडण्यासाठी जी परिभाषा त्यांनी वापरलेली आहे, ती परिभाषादेखील असांकेतिक असल्याने या पुस्तकांचा योग्य तो ठसा उमटू शकला नाही. तो उमटण्याची गरज होती आणि आहे. समीक्षेची दृष्टी सूक्ष्म बनावयाची असेल तर प्राथमिक प्रक्रिया म्हणून अनेकविध संवेदनारीतींचा परिचय व संकर होण्याची गरज असते. या संदर्भात प्रा. सरदेशमुखांच्या समीक्षालेखनाचा विचार करणे युक्त ठरेल.

त्यांच्या समीक्षालेखनाचा दुसरा एक विशेष ध्यानात येतो. प्रा. श्री. के. क्षीरसागरांनी आपल्या 'टीकाविवेक' या ग्रंथात मराठी काव्याचा यापुढचा टप्पा म्हणून गूढगुंजनात्मक काव्याचा निर्देश केला

अनुक्रमणिका

होता. जीवनवादी व आशयानुगामी समीक्षेच्या विकासाची हीच दिशा प्रा. सरदेशमुखांना अभिप्रेत दिसते. मात्र ते साहित्याच्या संमिश्र स्वरूपाची अधिक सूक्ष्म जाणीव करताना दिसतात. आता आत्मिक भान हे कोणत्याही दृश्य व्यवहारात मूल्य म्हणून प्रस्थापित करण्याची आकांक्षा साहसस्वरूपाची असते. हे साहस करण्यासाठी आपल्या विचारावरील श्रद्धेचे मोठे बळ लागते. प्रा. सरदेशमुख यांनी हे बळ अंगी बाणविलेले दिसते. साहित्याचा आध्यात्मिक क्षेत्रातील तरल अनुभवाशी अनेक ठिकाणी स्पर्श होत असतो. हा विचार आपल्या पारंपरिक समीक्षादृष्टीत अंतर्भूत आहे. पाश्चिमात्य साहित्यविचारातदेखील प्लेटो, लाँजायनस, कोलरिज या टीकाकारांनी या विचारांचा उल्लेख केलेला आढळतो; पण तो त्यांचा पायाभूत विचार होत नाही. शेलीसारख्या प्लेटोभक्त कवींचा उल्लेख प्रा. सरदेशमुखांनी या ग्रंथात केला आहे. असे जरी असले, तरी या आध्यात्मिक अंगाचा आधार घेऊन समीक्षेच्या तात्त्विक विचाराची रचना करण्याचा प्रयत्न फार कमी वेळा झालेला आढळतो. या प्रयत्नांना फार मोठी मान्यता प्राप्त होण्याची अडचण आपल्याकडेही दिसते, आत्मिक भानावर आधारलेली समीक्षेच्या तात्त्विक विचारांची रचना करण्याचा प्रयत्न प्रा. सरदेशमुखांनी या ग्रंथात केला आहे. या प्रयत्नातील काही विचार अंतर्वेधी आहेत. त्यांची दखल घेणे आवश्यक आहे.

ग्रंथात एकूण सहा लेख आहेत. लेखांची शीर्षके पाहिली तर त्यांच्या स्वरूपांचा अंदाज करता येतो. १– 'शून्यात परार्धे भरली !', २– 'उध्वस्तपणाचे धुमारे', ३– 'भंजन रचनेसाठी', ४– 'समयुगीन सन्मुखता', ५– 'समुद्री चहुकडे पाणी' व ६– 'प्रदेश साकल्याचा'. शीर्षकांवरून या समीक्षेचे स्वरूप बऱ्याच अंशी सर्जनशील व संवेदनाशील (creative and impressionistic) असावे हे ध्यानात येते. शेवटचे दोन लेख विस्तृत आहेत. तेच अधिक आस्थेवाईकपणे जाणून घ्यावे लागतात.

'प्रदेश साकल्याचा' या लेखात समीक्षापद्धतीविषयी प्रा. सरदेशमुख लिहितात, 'समीक्षेचे शास्त्र किंवा तिची मोहक कला करण्याचे सगळे प्रयत्न माहित करून घेऊनही नवा समीक्षक निर्माणशील साहित्यिकाप्रमाणे समीक्षेत आपल्या सर्वस्वानिशी स्वत:ला झोकून देत असतो. जातिवंत समीक्षक समीक्षेत आपल्या संपूर्ण व्यक्तिमत्त्वाने उतरलेला असतो.' निर्माणशील समीक्षा ही समीक्षेची वेगळी जात आहे काय ? असा प्रश्न उपस्थित करून उत्तरादाखल ते म्हणतात, की ही समीक्षा साकल्याचा साकल्याने विचार करणारी असते. प्रत्यक्ष घटितांचे आकलन व वास्तवाचे (रिआलिटी) आकलन हे एकच असत नाहीत. वास्तव हे असंख्य ज्ञात-अज्ञात घटितांचे संबद्ध व संकुल रूप असते. घटितांचे परिणामरूप एकसारखे बदलते. त्या बदलत्या रूपच्छाया मानवी जीवनातील अंतिम सत्याची केवळ संबोधना करतात. निर्माणशील समीक्षा या सूक्ष्म, समावेशक, अंतिम सत्याचे आकलन, आस्वाद व मूल्यमापन करते म्हणून ही समीक्षापद्धती परिणत स्वरूपाची आहे, असे प्रा. सरदेशमुखांना वाटते. ते लिहितात, "समग्रतेचा विचार केल्यावाचून कोणत्याही (बौद्धिक वा भावनिक) तर्कपद्धतीला साहित्यिक निर्मिती व समीक्षा यांत महत्त्व प्राप्त होणे शक्य नाही. भौतिक शास्त्रे केवळ बुद्धितर्काला शरण जाणारी असल्याने मनुष्यजीवनातील भावतर्काच्या शरणतेचा उपहास करतात. पण साहित्यकलेत या दोन्ही तर्कांचे संकलन साधण्याचा महान खटाटोप चाललेला असतो. कोणताही एक तर्क कितीही सुसंघटित असला तरी समग्रतेच्या विचाराच्या संदर्भात भोंदू हातचलाखीचा वाटतो. साकल्याचा प्रदेश आखडून घेणे हे पतितपणाचे लक्षण ठरते" 'तेच पतित की जे आखडिती प्रदेश साकल्याचा !' मर्ढेकरांचे विवेचन प्रा. सरदेशमुखांना एकांगी व अनर्थदायी वाटते. कारण इंद्रियानुभूतींना त्यांनी अवास्तव महत्त्व दिले व अनुभवाच्या समग्रतेला डावलले आणि असावधपणे त्याला जीवननिरपेक्ष मानले. समग्रतेच्या स्पष्टीकरणासाठी त्यांनी अनेक तत्त्वचिंतकांची साक्ष काढलेली आहे. त्या सर्वांवरून असा निष्कर्ष निघतो, की साकल्याच्या आकलनामध्ये अंत:प्रेरणेला अतिशय महत्त्व प्राप्त होते आणि अंत:प्रेरणेचा वस्तुनिष्ठ विचार करणे अवघड असते. या अडचणीची जाणीव प्रा. सरदेशमुखांना आहे. या संदर्भात नॉथ्रॉप फ्रायचे म्हणणे त्यांनी उद्धृत केले आहे, 'मूल्यनिर्णय व्यक्तिगतच असतात. फॅशन

म्हणून पुष्कळांनी ते उचलले म्हणजे वस्तुनिष्ठ असल्याप्रमाणे वाटतात इतकेच '.

साकल्यविचाराचा पाठपुरावा 'समुद्री चहुकडे पाणी' या लेखातही केला आहे. हा पाठपुरावा तत्त्वज्ञानाच्या अंगाने केला आहे. आधिभौतिक विचारांचे विषय इंद्रियगोचर असतात, तर आध्यात्मिक विचारांचे इंद्रियातीत असतात. आत्म्याचे स्वरूप ओळखणारी इंद्रिये नाहीत; म्हणून आत्मरूपाला 'स्वसंवेद्य' म्हटले आहे. प्रा. सरदेशमुख साक्षेपाने लिहितात, "आत्मा" या शब्दाने पुष्कळांना बिचकायला होते. मला त्याचे भय व गूढ वाटत नाही. माझ्यातली प्राणशक्ती व जाणशक्ती तो माझा आत्मा... साहित्यविचार करताना अध्यात्म कशाला लुडबुडते म्हणणाऱ्यांनीच शांतपणे फिरून विचार करण्याची वेळ आली आहे–मला हे सतत जाणवले आहे, की साहित्य ज्या मनश्चेतनेच्या बळावर मानवी जीवनाचे आकलन करू पाहते, त्या चेतनेचे गुणधर्म पाहू जाणे हेच अध्यात्मचिंतन होय'- इंद्रिय संवेदनांच्या बडिवारापाशी जी समीक्षा रेंगाळते ती साहजिकच 'घाटा'वर खिळून बसते. इंद्रियसंवेदनांच्या अपेक्षेने साहित्यसौंदर्याचा विचार करू पाहणे म्हणजे संवेदनांची एकूण संकुलता, अंतःकरणाशी असलेली तिची अनिवार्य निबद्धता आणि समग्र अनुभवाची संवादातुरता यांच्याकडे कानाडोळा करणेच होय. तसे केल्याने साहित्याच्या व सौंदर्याच्या सर्वांग विचाराला पहिल्याच टप्प्यावर खो मिळालेला असतो. नितांत आत्मनिष्ठा हे साहित्यातील अध्यात्म होय. इंद्रिय संवेदना व अतींद्रिय आकलन यांचे अतूट नाते ओळखणाऱ्यालाच वास्तवाचे आणि सत्याचे स्वरूप ओळखता येईल ...... तर्कशास्त्राने 'सयुक्तिक' असणारा विचार नैतिक व आत्मिक दृष्ट्या 'असुंदर' असण्याची शक्यता सतत निर्माण होते.

प्रा. सरदेशमुखांचे हे जे साकल्याबद्दलचे विचार आहेत, त्यांची छाननी होणे अगत्याचे आहे. तसे करताना हे विचार समीक्षातत्त्वे म्हणून कोणत्या स्वरूपात व किती प्रमाणात वापरता येतील याचाही ऊहापोह करणे अगत्याचे आहे.

वरील विचारांच्या प्रकाशात प्रा. सरदेशमुखांनी अन्य विषयांवरही आपले अभिप्राय व्यक्त केलेले आहेत. आधुनिकतेसंबंधीचा त्यांचा अभिप्राय असा. 'जे जे प्राचीन, अर्वाचीन व समकालीन त्या त्या सर्वांत वावरणारी एकसूत्रता व समान सचेतना जाणणारी संवेदनशीलता म्हणजे आधुनिकता.' 'तारुण्याची ऐश्वर्ये ल्यालेले' विद्रोही साहित्य त्यांना स्वागतार्ह वाटते, तसेच उध्वस्तपणाचे घुमारे साकार करणाऱ्या साहित्यकृतीही त्यांना अर्थपूर्ण वाटतात. कलावंत साहित्यिक हा एक सूक्ष्म आत्मयोगी असू शकतो. नवे मराठी साहित्य हा आत्मयोग साधत आहे. आमची दृष्टी हरवली नाही पाहिजे. या विश्वरूप दर्शनाने आम्ही विमूढ आणि व्यथित नाही झाले पाहिजे. साहित्यकृतीच्या आकारासंबंधीचा त्यांचा अभिप्राय असा: 'आशय ही आकार घेऊ पाहणारी एक अनाकार चेतना असते. आकृतीमध्ये आकाराला सापेक्ष शिलावस्था प्राप्त झालेली असते. सर्व कला आकारांचा ध्यास घेतात, आणि आकृती निर्माण करतात. एखादी वाङ्मयकृती तिचा घाट घेऊन जन्माला येते हे बोलणे फसव्या स्वरूपाचे आहे.'

प्रा. सरदेशमुखांचा हा ग्रंथ त्यांची समीक्षादृष्टी समजावून घेण्यासाठी उपयुक्त झालेला आहे. आपली समीक्षादृष्टी मांडताना त्यांनी एक नवी परिभाषा अभावितपणे निर्माण केली आहे. ही दृष्टी व ही परिभाषा काही प्रमाणात मराठी समीक्षेच्या प्रमुख धारेत रुजेल अशी आशा आहे. या दृष्टीचे उपयोजन सुसंगतपणे करणारा समीक्षा-उपक्रम प्रा. सरदेशमुख चालू ठेवतील अशी अपेक्षा आहे. या दृष्टीचे सावधानपणे परीक्षण होणेही अगत्याचे वाटावे इतका ठसठशीतपणा या ग्रंथाच्या रूपाने प्रा. सरदेशमुखांनी आपल्या दृष्टीस प्राप्त करून दिला आहे.

**--म. द. हातकणंगलेकर**

---

**'रापण'** – प्रल्हाद अनंत धोंड; मौज प्रकाशन गृह, मुंबई; १९७९; पृ. २०+२६६ किंमत ३० रुपये.

---

पाश्चात्त्य जगात कला व कलावंत यांच्यासंबंधी पुस्तके सातत्याने लिहिली जातात. त्यात कलाकृतींचे रसग्रहण–मूल्यमापन करणारी जशी असतात, तशीच

कलावंतांचे चरित्र, स्वभावातील गुणदोष यांचे वर्णन करणारी व्यक्तिमत्त्वसापेक्षही असतात. मराठीत आतापर्यंत अशी पुस्तके जवळजवळ नाहीतच. त्यामुळे कला व कलावंत यांविषयी किमान जाण व कुतूहल समाजात निर्माण होत नाही वा थोडेफार असले तरी त्यांचे नीटपणे उपशमन होत नाही. कलेविषयी एक वातावरण समाजमानसात निर्माण करण्याचे मौलिक कार्य ही पुस्तके करतात. त्यामुळे ती समाजाची एक सांस्कृतिक गरजच होऊन बसते. आता मराठीतील ही उणीव दूर करणारे व अशा प्रकारात मोलाची भर घालणारे एक पुस्तक अलीकडेच बाजारात आले आहे. तर त्याचे स्वागत खुल्या दिलाने व मोठ्या प्रमाणावर व्हावयास हवे.

हे पुस्तक आहे ' रापण ' व लेखक आहेत प्रल्हाद अनंत धोंड. हे एक बहुमुखी व्यक्तिमत्त्वाचे हरहुन्नरी गृहस्थ आहेत. ते स्वतः उत्कृष्ट चित्रकार आहेत. जलरंगातील निसर्गचित्रे, प्रायः सागरचित्रे हा त्यांचा प्रांत. शिवाय ते एक नामवंत लोकप्रिय शिक्षक आहेत. जे. जे. स्कूल मध्ये शिक्षक–प्रशिक्षण विभागाचे प्रमुख, डीन व कला संचालक अशी वाढत्या जबाबदारीची पदे त्यांनी भूषविली आहेत. ते एक उत्कृष्ट नकलाकारही आहेत. गप्पांची मैफल रंगवून सोडणारे गोष्टीवेल्हाळ आहेत. अशा गप्पांतूनच या पुस्तकाचा जन्म झाला आहे. हे पुस्तक म्हणजे धोंडांच्या आठवणी आहेत. गप्पांतून म्हणजेच नाट्यरूप निवेदनातून त्या साकारल्या आहेत. पण केवळ शिळोप्याच्या, मनोरंजक विनोदी गप्पा असे त्याचे स्वरूप नाही. प्रस्तावनेत प्रा. कदमांनी म्हटल्याप्रमाणे 'अंतर्यामीचा कोंडलेपणा विसरून जाण्याचे ते एक साधन ' आहे. ' जीवनातल्या विसंगतीबरोबरच त्यात दडलेल्या कारुण्याची तीव्र धार अंतर्यामी उमळून टाकण्याचे सामर्थ्य ' त्यात आहे. म्हणूनच या आठवणींना कारुण्याची किनार आहे. धोंड हे माणसांमध्ये रमणारे, लोकधार्जिण्या वृत्तीचे आहेत. ते म्हणतात, ' माणसे न्याहाळीत बसणे हा माझा आवडता छंद. माणसे त्यांच्या बऱ्यावाईट बारकाव्यांसह आणि गुणदोषांसह माझ्या मनात नकळत बसतात.' या वृत्तीचा रम्य व सुखद प्रत्यय या पुस्तकातून पानोपानी येतो. या वृत्तीमुळेच या पुस्तकाचे स्वरूप व्यक्तिचित्रणप्रधान झाले आहे. खेरीज धोंड हे चित्रकार असल्याने अशा व्यक्तिचित्रांना व तदानुषंगिक घटितांना एक दृश्यात्मक गुणवत्ता लाभली आहे. सारे अनुभवविश्व डोळ्यांपुढे कसे साक्षात होऊन उभे ठाकते ! माणसाला आपलेसे करून घेण्याची, त्याला समजावून घेण्याची व समजावण्याची एक हातोटी धोंडांना लाभली आहे. एक जीवनासक्त, समाधानी, अनाग्रही, दिलखुलास, मनमोकळे, कलासक्त व आनंददायी असे हे व्यक्तिमत्त्व आहे. त्याला मिस्किल विनोदाची झालर आहे आणि प्रा. कदमांनी या पुस्तकाचे जे शब्दांकन केले आहे, त्यात ते कुठेही धोंडांच्या व्यक्तिमत्त्वाच्या आड आलेले नाहीत. त्यामुळे निवेदकाच्या व्यक्तिमत्त्वाचे अगदी नितळ पारदर्शी प्रतिबिंब शैलीतून दिसते. ही निवेदनशैली रेखीव, ललितरम्य व प्रवाही आहे. त्यामुळे पुस्तकाची वाचनीयता कुठेही तसूभरदेखील उणावत नाही.

पण हे या पुस्तकाचे खरे वैशिष्ट्य नव्हे. या पुस्तकाची खरी मौलिकता त्याच्या अनुभवविश्वात आहे. महाराष्ट्रातील गेल्या पन्नासएक वर्षांतील दृश्यकलेचे विश्व त्यातून साकारले आहे. हे विश्व जे दिसते, ते जे. जे. स्कूलच्या माध्यमातून. जे. जे. स्कूल ऑफ आर्ट ही महाराष्ट्रातील अग्रेसर व मातब्बर कलाशिक्षण संस्था. तिचा इतिहासच स्थूलमानाने व महत्त्वाच्या टप्प्यांनिशी 'रापण' मध्ये येतो. संस्थेतील कलाशिक्षणात काळाच्या ओघात घडत गेलेली परिवर्तने; सॉलोमन पासून ते पळशीकरांपर्यंत वेगवेगळ्या डीन्सच्या कारकिर्दी व त्यांतील यशापयशाचे विश्लेषण; सालोमन साहेबांनी भारतीय कलेच्या पुनरुज्जीवनाचे केलेले प्रयत्न; जेरार्डप्रणीत भारतीय कलेच्या आधुनिकत्वाची मीमांसा व त्या पार्श्वभूमीवर 'प्रोग्रेसिव्ह आर्टिस्ट ग्रूप'ने भारतीय कलेला आधुनिक व्यक्तिमत्त्व प्राप्त करून देण्याच्या संदर्भात केलेले कार्य; १९३२ मध्ये टॉमस कमिटीने स्कूल बंद करण्याचा आदेश दिल्यानंतर स्कूलने उभारलेले आंदोलन व त्याचे भव्य यश; १९५७ मध्ये साजरी झालेली जे. जे. ची शताब्दी व लगेचच स्कूलचे झालेले उद्वेगजनक त्रिभंगीकरण; धोंडांच्या कारकिर्दीत स्कूलला लाभलेली सामाजिक प्रतिष्ठा व वाढती लोकप्रियता; स्कूल डिनर्स व साहित्यिकांचे सन्मान ह्या सर्वच ठळक घटनांतून स्कूलचे—या संस्था-

पुरुषाचे एक व्यक्तिमत्त्वच भव्यपणे मनापुढे उभे राहते. यांखेरीज मुंबईतील कलाविषयक अन्य घडामोडी व संघटना—बाँबे आर्ट सोसायटी, जहांगीर आर्ट गॅलरी, आर्टिस्ट सेंटर, राज्य कला प्रदर्शने यांचाही धावता मागोवा या पुस्तकात येऊन गेला आहे. ह्याच संदर्भात जे. जे. स्कूलच्या अभ्याससहली, कलकत्त्याच्या 'शांतिनिकेतन' मधील भयानक वास्तव्य व शिक्षणपद्धती-विषयीचे असमाधान हे मुद्देही लक्षात घेण्याजोगे आहेत. यांखेरीज धोंडांनी कलाशिक्षण, बालकला, आधुनिक कला अशा महत्त्वाच्या विषयांवर व समस्यांवर वेळोवेळी केलेले विचारमंथनही मौलिक आहे.

ह्यापेक्षाही या पुस्तकाचे महत्त्व आणखी एका दृष्टीने आहे. सर जे. जे. स्कूलने अनेक भारतीय व आंतरराष्ट्रीय ख्यातीचे कलावंत महाराष्ट्राला दिले. त्यांच्या कलेविषयीचे रसग्रहण व मूल्यमापन आणि कलावंतांची वेधक व्यक्तिचित्रे ह्यांनी या पुस्तकाला एक आगळीच उंची लाभली आहे. जे. जे. परंपरेव्यतिरिक्तही अन्य चित्रकार—शिल्पकारांचे यथायोग्य निर्देश पुस्तकात आले असल्याने एकूण भारतीय कलेचेच एक समग्र चित्र अनुरूप अशा व्यापक व विशाल पटावर रेखाटले गेले आहे, असे म्हणता येईल. काही उदाहरणे नमुन्यादाखल पहावीत : पेडणेकर मास्तरांच्या रंगांकनामधील जलरंगाची द्रवता व रुंदी आणि आपले कलाकसब दुसऱ्यापासून चोरून व झाकून ठेवण्याचा त्यांचा स्वभावधर्म; त्रिदाद यांचे चित्राच्या रंगसंगतीतील समग्रतेचे भान व आयव्हरी ब्लॅकचा अपवादभूत पण वैशिष्टयपूर्ण वापर; हेब्बर यांचे रंग भरण्यातील प्रभुत्व व चावडांच्या रेषांचे लयबद्ध नर्तन; सडवेलकरांची विशुद्ध अमूर्त चित्रशैली; शेरगिलने घडवलेला पौर्वात्य व पाश्चात्य चित्रपद्धतीचा मिलाफ; गायतोंडे म्हणजे भारतीय पॉल क्ली; हर किशन लाल यांचे 'जळजळीत' (हे विशेषणच केवढे प्रत्ययकारी) रंग; हुसेनच्या चित्रातील घोडदौड व आराचा आदिम रांगडेपणा. ही वैशिष्टये मर्मग्राही नेमकेपणाने पुस्तकात कशी अवतरतात, हे मुळातूनच वाचण्याजोगे आहे. पळशीकरांचे 'सीनर्स डिव्हाईन' हे चित्र, म्हात्र्यांची 'मंदिराकडे' व करमरकरांचे 'अश्वारूढ शिवाजी महाराज' ही शिल्पे यांसंबंधीचे विवेचनही असेच वाचनीय आहे.

हे झाले कलावंतांच्या कलाकृतींबद्दल. त्यांच्या स्वभावधर्माचेही मासलेवाईक नमुने जागोजाग आढळतात. कलावंतामधील व्यक्तीची सुखदुःखे व वल्लीचा लहरी विक्षिप्तपणा यांची एक मजेशीर वीण व त्यातून दृग्गोचर होणारे मानवी स्वभावाचे पोत हे या पुस्तकाचे साहित्यिक मोल. चुडेकर मास्तर रंगांविषयी आध्यात्मिक भाषेत बोलतात, 'तीन प्रामयरी कलर म्हणजे सत्त्व, रज आणि तम... काळा रंग दिसत नाही म्हणून तो परमेश्वर... चित् म्हणजे प्रकाश. या प्रकाशातून निर्माण होतं ते चित्र' (ही तर आधुनिक इंप्रेशनिस्ट थिअरी) या भाषेतूनच हे व्यक्तिमत्त्व आकाराला येते. चिमुलकरांचे व्यक्तिचित्र काळजाला चटका लावणारे, आर्तकरुण असे. त्यांच्या आयुष्याची अखेर व त्यांच्या चित्रातील साल्वादोर दालीसदृश भयानक स्वप्नसृष्टी यांतील संगती मनाला उदास व अंतर्मुख करणारी आहे. गोडबोले ही एक लक्षात राहण्याजोगी वल्ली. कलासिद्धीतील वैगुण्य व्यावहारिक धूर्तपणाने भरून काढण्याचा त्यांचा कावेबाजपणा खास अविस्मरणीय. अतिशय महत्त्वाकांक्षी आणि पैसा, लौकिक प्रतिष्ठा, नोकरीतील मानमरातब यांची सतत ईर्षा बाळगणाऱ्या, पण मर्यादित कलासिद्धी असलेल्या व माफक परिश्रम करणाऱ्या दादा आडारकरांचे व्यक्तिचित्रही विलोभनीय आहे. त्यांचे व्यवहारकौशल्य, धूर्तता, राजकारणपटुत्व आणि त्या बळावर हवे ते पदरात पाडून घेण्याची तयारी यांचा उपसर्ग इतर अनेकांना पोहोचतो; पण धोंडांना पोहोचत नाही. कारण या राजकारणपटुत्वात व व्यवहारवादातही मैत्रीचा, जिव्हाळ्याचा धागा अंतःकरणात कुठेतरी खोलवर रुतलेला असतो व त्या पोटी एक असहाय्यता येते. म्हणूनच धोंड त्यांच्याविषयी म्हणतात, 'ही वॉज हेल्पलेसली ए फ्रेंड ऑफ माइन.' विनायक मसोजी या देखण्या व रुबाबदार कलावंताच्या आयुष्यात सोनालीच्या रूपाने घडलेला नाजुक प्रसंग व त्यातून वाट काढण्यातील त्यांचे नैतिक धैर्य हे प्रसंगचित्रण उत्कृष्ट आहे. या पुस्तकातला काळजाला चटका लावणारा आणखी एक करुण व आर्त प्रसंग म्हणजे वडकेबाईंचा. त्यांच्या आयुष्यातला एकाकीपणा व त्याची पोकळी भरून काढण्याचे त्यांचे प्रयत्न. सगळाच स्त्रीत्वाच्या भुका

अतृप्त राहिलेल्या. त्याचेच भावनिक प्रक्षेपण म्हणजे त्यांचे भावाच्या कुटुंबात रममाण होणे व लोकांना भरपूर खाऊपिऊ घालणे. संसारसुखाची व मातृत्वाची भूक त्या अशा परीने भागवत. त्यांची वरवरची रंगरंगोटी, शरीर-प्रसाधन हे अधिकच केविलवाणे व करुण वाटते. जीवनातला सहचर शोधण्याची त्यांची धडपड, त्यातले वैयर्थ्य व त्यामुळे येणारा हताशपणा; त्यांचा अखेरचा असाध्य आजार-यकृताचा कॅन्सर-व पोलीस इन्स्पेक्टर भावाला केलेली विनवणी – 'पिस्तुल घे आणि गोळी घाल'– हे सगळेच विलक्षण हृदयद्रावक आहे. एक अतिशय अस्वस्थ करणारी कासाविशी या प्रसंगामागे आहे. धोंडांच्या व्यक्तिगत आयुष्यातील सुखदुःखेही या पुस्तकात अधूनमधून येतात. त्यांच्या पत्नीचे कॅन्सरने निधन झाल्यानंतर त्यांनाही एकाकीपणा व सुन्न पोकळी जाणवत राहते. पण ज्या मानसिक सामर्थ्याने व समाजाभिमुख वृत्तीने ते दुःखाचे उदात्तीकरण करतात, त्यामुळे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा समतोल कायमच राहतो आणि या पार्श्वभूमीवर वडकेबाईंचा करुण अंत मनाला अधिकच खिन्न करतो. पुस्तकाच्या अखेरच्या प्रकरणातील एकाकी निवासाचे व मृत्यूच्या गूढ ओढीचे चित्रण हेही उत्कृष्ट साहित्याचेच नमुने आहेत.

या पुस्तकात असे जे काही प्रसंग व व्यक्तींची तदानुषंगिक सुखदुःखे आहेत व त्यांची हाताळणी ज्या संयमाने पण उत्कटपणे झाली आहे, त्यामुळे या पुस्तकाला एक मोठेच साहित्यमूल्य लाभले आहे. असे काही प्रसंग म्हणजे उत्कृष्ट साहित्यकृतीच (लिटररी पीसेस) आहेत. जीवनाच्या भिन्न भिन्न क्षेत्रांतील व्यक्तींच्या आठवणींना ( मेम्वार्स ) साहित्यरूप होणे, ही एक दुर्मिळ घटना आहे. त्यामुळेच लक्ष्मीबाई टिळकांच्या 'स्मृतिचित्रां'च्या परंपरेमध्ये या पुस्तकाची गणना करावी लागेल. मुख्यतः त्यातील अनाग्रही व समरस पण अलिप्त मनोवृत्ती व माणूसधार्जिणेपणा हे गुण मोठे विलोभनीय आहेत. 'रापण' मधील कलाविश्व हे असे साहित्यगुणांनी उजळून निघाले आहे.

– एस. डी. इनामदार

---

**'यक्षांची देणगी' : ( विज्ञानकथा ) लेखक : जयंत नारळीकर ; मौज प्रकाशन, मुंबई, १९७९ ; १२+२३७ ; किंमत २१ रु.**

मराठी साहित्यात विज्ञानकथा लिहिण्याचे धाडस फारसे कोणी करीत नाही. त्यातून एखाद्या प्रथितयश वैज्ञानिक संशोधकाने ते केले, तर त्याची संशोधनक्षमता संपुष्टात आली असावी अशी कुत्सित टीका केली जाते. अशा परिस्थितीत सुप्रसिद्ध संशोधक डॉ. जयंत नारळीकर यांनी स्वतःचे शिक्षण हिंदी माध्यमाच्या शाळेत झालेले असताना व कित्येक वर्षे परदेशात वास्तव्य केलेले असताना सुद्धा मराठीत लिहिलेल्या प्रस्तुत दर्जेदार विज्ञानकथासंग्रहाचे खुल्या अंतःकरणाने स्वागत करावयास हवे.

विसाव्या शतकात विज्ञान व तंत्रज्ञानात प्रचंड प्रमाणावर प्रगती झालेली आहे. वैज्ञानिक शोध व त्यांचे तंत्रज्ञानात झालेले रूपांतर यांमुळे सामान्य माणसाच्या जीवनचर्येत क्रांतिकारक बदल घडून आलेले आहेत ( उदाहरणार्थ, करमणुकीची व प्रवासाची साधने ). तथापि या बदलांचा जाणीवपूर्वक स्वीकार करणे व त्यांचा दुरुपयोग न करणे हे सामान्य माणसालाच काय पण राजकारण्यांना व व्यावसायिक लोकांनाही शक्य झालेले नाही. वैज्ञानिक शोधांवर आधारलेला तंत्रज्ञानाचा आपण अशा प्रकारे व्यवहारात पदोपदी उपयोग करीत असलो, तरी सामान्यतः विज्ञानाची भाषा रुक्ष, बोजड पारिभाषिक शब्दांनी भरलेली व बऱ्याच वेळा गणिती असल्याने सर्वसाधारण माणूस निव्वळ विज्ञानविषयक माहिती वाचण्याच्या सहसा भानगडीत पडत नाही. अशी माहिती सोप्या शब्दांत मांडण्याचे प्रयत्न काही मराठी वर्तमानपत्रातून व नियतकालिकांतून क्वचित होत असतात ; पण त्यात मूलभूत माहितीपेक्षा काही प्रासंगिक सनसनाटी विषयांवरच भर असलेले (तेही कित्येकदा वैज्ञानिक अचूकतेची जाण नसलेले) लेखन प्रसिद्ध होत असते. या पार्श्वभूमीवर विज्ञानाची कडू गेली कथारूपी साखरेचे आवरण देऊन जनसामान्यात प्रसृत करणे, हा डॉ. नारळीकर यांचा उद्देश उचित वाटतो. विज्ञानकथा ही मनोरंजनात्मक व माहितीपर असण्याबरोबरच ती भविष्यातील विज्ञानाचे अघोरी स्वरूप मांडणारी निव्वळ भयकथा

असू नये या त्यांच्या विचाराशी कोणताही संवेदनाशील वाचक सहमत होईल, यात शंका नाही. वैज्ञानिकांनी विज्ञानकथा लिहाव्यात की नाही किंवा विज्ञानकथा लिहिण्याकरिता लेखक वैज्ञानिक संशोधक असणे आवश्यक आहे की नाही यासंबंधीची त्यांची मते कदाचित वादग्रस्त होऊ शकतील; पण ज्या प्रस्थापित लेखकांना अशा कथा लिहावयाच्या असतील, त्यांना अचूक ( अगदी तपशीलवार नव्हे ) वैज्ञानिक माहिती असणे व त्या माहितीचे भविष्यकाळाकरिता प्रक्षेपण (प्रोजेक्शन) करताना योग्य तोल राखणे आणि विज्ञानकथा म्हणजे निव्वळ कल्पनांच्या भराऱ्या नव्हेत हे लक्षात ठेवणे अत्यावश्यक आहे असे वाटते.

'यक्षांची देणगी' या शीर्षककथेत गणकयंत्रांची सूक्ष्मतेकडे व अधिकाधिक कार्यक्षमतेकडे होत असलेली वाटचाल आणि पृथ्वीपलीकडील प्रगत जीवसृष्टीचे प्रत्यक्ष हल्ल्यापेक्षा अशा सूक्ष्म गणकयंत्रांच्या द्वारे पृथ्वीवर ताबा मिळविण्याचे संभाव्य प्रयत्न यांचे अतिशय उत्कंठा वाढविणारे मनोवेधक चित्रण केलेले आहे. 'धूमकेतू' या कथेत अंधश्रद्धा व वैज्ञानिक प्रयत्न यांतील वैचारिक व व्यावहारिक पातळ्यांवरील संघर्ष दाखविलेला असून जाताजाता कंटाळवाण्या सत्कारसमारंभावरही खोचक भाष्य केलेले आहे. यंत्रांवर अवलंबून राहण्याची विसाव्या शतकातील वाढती प्रवृत्ती अंती भविष्यकाळात कशी घातक ठरेल, याचे विवरण 'अखेरचा पर्याय' या कथेत परिणामकारकपणे केले आहे. 'गंगाधरपंतांचे पानिपत' ही कॅटॅस्ट्रॉफी थिअरीवर आधारलेली कथा काहीशी फँटसीकडे झुकल्यासारखी वाटते. कृष्णविवराच्या पृष्ठभागाजवळ गुरुत्वाकर्षणामुळे काळाची गती शून्यवत् होते या आइन्स्टाइन यांच्या सापेक्षता सिद्धांताच्या निष्कर्षावर आधारलेली 'कृष्णविवर' ही कथा डॉ. नारळीकर यांची पहिलीच विज्ञानकथा या दृष्टीने खचितच चांगली आहे. मंगळाच्या पृष्ठभागाच्या खाली प्रगल्भ जीवसृष्टी असण्याची शक्यता गृहीत धरून लिहिलेली 'दृष्टिआड सृष्टी' ही कथा अवकाश संशोधनातील मानवरहित यानांच्या मर्यादा स्पष्ट करते. 'ट्रॉयचा घोडा' या कथेत द्रव्य व प्रतिद्रव्य ( मॅटर व अँटिमॅटर ) हे परस्परविरोधी आणवीय संरचना असलेले घटक एकत्र आल्यास एकमेकांना नष्ट करतील या तत्त्वाचा आधार घेतला आहे. तथापि पायोनियर-१० ची प्रतिद्रव्ययुक्त प्रतिकृती अगोदरच नष्ट न होता सूर्यकुलाच्या इतक्या जवळ कशी येऊ शकेल हे संदिग्धच ठेवले आहे. 'धोंडू' ही कथा थोडीशी चमत्कृतीपूर्ण वाटली, तरी अतिप्रगत जीवसृष्टीच्या बाबतीत अशक्य कोटीतील नाही. इतर कथांच्या मानाने 'पुत्रवती भव' व 'नौलखा हाराचे प्रकरण' या गोष्टी बऱ्याचशा वेगळ्या तत्त्वांवर आधारलेल्या आहेत. 'पुत्रवती भव' या कथेत 'पुत्रलाभ हीच जीवनाची इतिकर्तव्यता' या मानवाच्या दुर्बल भावनेला प्राधान्य देणाऱ्या व त्याकरिता बुवाबाजीच्या मागे लागणाऱ्या सामान्य जनांचे सुंदर चित्रण केले आहे; पण त्याचबरोबर आपल्या शोधाचा दुरुपयोग होईल असे वाटल्यावरून तो नष्ट करण्याचा निर्णय घेणाऱ्या (परंतु प्रत्यक्षात विरळाच आढळणाऱ्या) संशोधकाचे चित्र दिलासा देणारे वाटते. याच कथेवर आधारलेले नभोनाट्य पुणे आकाशवाणी केंद्राने सादर केले होते. एच्. जी. वेल्स यांच्या टाइम मशीनप्रमाणे भविष्यकाळात जाता येईल पण परत भूतकाळात येता येईल की नाही या वादग्रस्त प्रश्नावर आधारलेली 'नौलखा हाराचे प्रकरण'ही रूपांतरित गोष्ट मनोरंजक व नाट्यपूर्ण असली तरी, बरीचशी संदिग्ध आहे.

या संग्रहातील कथा ज्या वैज्ञानिक तत्त्वांवर आधारलेल्या आहेत त्यांचे थोडक्यात विवेचन पुस्तकाच्या शेवटी परिशिष्टात दिलेले आहे. जिज्ञासूंकरिता काही संदर्भ ग्रंथांची नावेही दिली आहेत. कथासंग्रहात वैज्ञानिक तत्त्वांचे विस्तृत विवेचन अपेक्षित नसले, तरी जो सामान्य वाचक लेखकाने डोळ्यासमोर ठेवला आहे असे वाटते त्याला या विवेचनाचा कितपत उपयोग होईल याची जरा शंका वाटते. विज्ञानाची कथारूपाने ओळख करून देणे हे लेखकाचे उद्दिष्ट योग्य असले, तरी प्रस्तुत कथासंग्रहातील काही कथांशी निगडित असलेल्या वैज्ञानिक तत्त्वांचे ( उदाहरणार्थ, 'उजव्या सोंडेचा गणपती' या कथेतील अवकाशाला पडणारा पीळ आणि डाव्याचे उजव्यात व उजव्याचे डाव्यात

होणारे रूपांतर ; 'ट्रॅयचा घोडा' यामधील द्रव्य व प्रतिद्रव्याचे अस्तित्व ) सामान्य माणसाला आकलन होणे पुष्कळच जड आहे.

प्रस्तावनेत डॉ. नारळीकर यांनी स्वतः म्हटल्याप्रमाणे ते सराईत लेखक नसले, तरी विज्ञान कथारूपाने रंगवून सांगण्याचे कसब त्यांना पुष्कळशा प्रमाणात साध्य झाले आहे, यात शंका नाही. त्यांचे गुरु फ्रेड हॉयेल यांचा या क्षेत्रातील आदर्श पुढे ठेवून डॉ. नारळीकर यांनीही मराठी विज्ञानकथाक्षेत्रात या कथासंग्रहाद्वारे पाय ठेवला आहे, त्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन. प्रस्तावनेत लेखकाने म्हटल्याप्रमाणे इतर वैज्ञानिक संशोधक तसेच प्रतिष्ठित लेखक यांनीही या कथासंग्रहावरून स्फूर्ती घेऊन निव्वळ कल्पनेच्या भराऱ्या नसलेल्या विश्वासार्ह तत्त्वांवर आधारलेल्या दर्जेदार विज्ञानकथा मराठीत सादर कराव्यात, असे आवाहन करावेसे वाटते.

— व. ग. भदे

## वाचकांचा पत्रव्यवहार–

संपादक 'नवभारत' मासिक, वाई यांस—

स. न. वि. वि.

हल्ली 'नवभारत' मासिकात चालू असलेला बखरविषयक श्री. संकपाळ व डॉ. ग्रामोपाध्ये यांचा पत्रव्यवहार वाचनात आला. या वादात दोघाही पत्रलेखकांनी माझे नाव निष्कारण गोविल्यामुळे हा खुलासा:—

गेली सुमारे पंचवीस वर्षे बखरींचा मी अभ्यास करूनही मला बखरीतले कळते असा दावा मी विद्यार्थी असल्याने करू शकत नाही. बखरींचा अभ्यास हा माझा आवडता छंद आणि जन्मभरचा उद्योग. काळ हाच खरा परीक्षक असतो अशी माझी श्रद्धा आहे. त्यामुळे 'डॉक्टरेटचा प्रबंध' वा 'नवचिंतन' ही बिरुदे माझ्या अभ्यासाला मी लावू इच्छित नाही.

माझ्या मौनाचा भलता अर्थ लाविला जाईल म्हणूनच माझा हा अनिच्छात्मक खुलासा.

कळावे.

आपला

-र. वि. हेरवाडकर

# सार-संकलन

## परदेश

### जीवनाचे मीठ– सॉल्ट २

'सॉल्ट' हे या संदर्भात 'स्ट्रॅटेजिक आर्म्स लिमिटेशन टॉक्स' ह्या लांबलचक नावाचे संक्षिप्त रूप आहे. ह्या नावाचा अर्थ रणनीतीत, युद्धाच्या डावपेचात वापरता येतील अशा किंवा वापरण्यासाठी म्हणून निर्माण करण्यात येणाऱ्या शस्त्रास्त्रांवर मर्यादा घालण्यासंबंधीची बोलणी. हे नाव जितके लांबलचक आहे तितकीच ही बोलणीही दीर्घकाल, अनेक वळणे घेत चालू आहेत आणि त्यांचा दुसरा टप्पा – सॉल्ट २– गेल्या जून महिन्यात यशस्वी रीतीने गाठण्यात आला आहे. ही बोलणी अर्थात् अमेरिका आणि रशिया यांच्यामध्ये होत आहेत. सॉल्ट १ हा पहिला टप्पा गाठल्यानंतर सॉल्ट २ गाठेपर्यंत सहा वर्षे उलटली.

ही बोलणी मुख्यतः अण्वस्त्रासंबंधीची आहेत. १९४५ मध्ये जेव्हा दुसरे महायुद्ध संपले तेव्हा जगात केवळ अमेरिकेकडे आणि केवळ एक अण्वस्त्र होते. ते म्हणजे हिरोशिमावर टाकलेल्या अणुबाँबसारखा अणुबाँब. आज अमेरिकेकडे ९२०० अणुशस्त्रास्त्रे आहेत व शहरे, औद्योगिक केंद्रे यांचा आणि त्याबरोबरच कोटचवधी माणसांचा संहार करायला ती समर्थ आहेत. रशियाकडे ४५०० 'रणनैतिक' अण्वस्त्रे आहेत. ती अमेरिकेकडे असलेल्या अस्त्रांपेक्षाही अधिक ताकदीची आहेत. सोळा कोटी माणसांचा क्षणात संहार करण्याचे त्यांचे सामर्थ्य आहे. ब्रिटन, फ्रान्स आणि चीन यांच्याकडे आज अण्वस्त्रे आहेत. साउथ आफ्रिका, इस्राइल, तैवान, कोरिया आणि पाकिस्तान अण्वस्त्रे बनविण्याच्या खटपटीत आहेत.

१९४५ मध्ये अणुबाँबचा मारा करण्याची एकच पद्धत उपलब्ध होती. बाँबफेक्या विमानातून बाँब इष्ट लक्षापर्यंत नेऊन तो त्याच्यावर टाकण्यात येत असे. आज ह्यासाठी तीन प्रकारच्या वहनपद्धती (डिलिव्हरी सिस्टिम्स) आहेत : विमानातून बाँब वाहून नेणे, समुद्राच्या पृष्ठभागाखालून पाणबुड्यांतून अणुबाँबचा मारा करणे आणि जमिनीवरील क्षेपणास्त्रांतून बाँब फेकणे.

वैज्ञानिक प्रगतीमुळे अण्वस्त्रेही अधिक विनाशक झाली आहेत. हॉयड्रोजन बाँबचा शोध लागला. नवीन बाँब अधिक आटोपशीर, आकारमानाने लहान असतात आणि त्यांचा अधिक बिनचूकपणे मारा करता येतो. हजारो मैलांवरून फेकलेले बाँब लक्ष्याच्या फारतर काही यार्डाइतक्या अंतरावर पडतात. ते लहान असल्यामुळे अनेक बाँब एकाच वेळेला एका अग्निबाणावर (रॉकेट) आरूढ करता येतात आणि त्यांतील प्रत्येक बाँब आपापल्या विशिष्ट लक्ष्याकडे जाऊन पोहोचेल अशी व्यवस्था करता येते. थोडक्यात असे म्हणता येईल, की आज अमेरिका आणि रशिया एकमेकांचा पुरता संहार करायला समर्थ आहेत. ह्या परिस्थितीत कुणाला अधिक सामर्थ्य कमावण्याची आवश्यकता नाही.

रॉबर्ट मॅक्नामारा जेव्हा अमेरिकेचे संरक्षणसचिव (सेक्रेटरी) होते तेव्हा त्यांनी ह्या परिस्थितीचे वर्णन 'मॅड' ह्या शब्दाने केले होते. 'मॅड' म्हणजे 'म्युच्युअली ॲश्श्युअर्ड डिस्ट्रक्शन' – एकमेकांचा विनाश करण्याची हमी. अमेरिका आणि रशिया ही दोन्ही राष्ट्रे आज इतकी सुसज्ज आहेत, की दुसऱ्याने हल्ला केला असता त्याची केवळ वाताहात करून टाकण्याचे सामर्थ्य त्यांच्याकडे आहे. "अणु-युद्ध झाले तर जे वाचतील ते मारले गेलेल्यांचा हेवा करतील" असे खुश्चाव ह्यांनी म्हटले होते.

अमेरिका आणि रशिया यांच्या दरम्यान चालू असलेली 'सॉल्ट' ही बोलणी दहा वर्षांपूर्वी सुरू

झाली. सॉल्ट १ हा पहिला टप्पा १९७२ साली गाठण्यात आला. हा टप्पा म्हणजे ह्या दोन राष्ट्रां-मधील करारनामा होता. ह्या कराराप्रमाणे आक्रमक शस्त्रांच्या उत्पादनावर तात्पुरत्या मर्यादा घालण्यात आल्या आणि विशेषतः क्षेपणास्त्रांविरुद्ध संरक्षणव्यवस्था उभारण्यावरही कडक बंधने घालण्यात आली. क्षेपणास्त्रांच्या साहाय्याने होणाऱ्या हल्ल्यापासून परिणामकारक रीतीने स्वतःचा बचाव करता येईल अशी खात्री एखाद्या देशाला वाटली, तर युद्ध सुरू करायला त्याला उत्तेजन मिळेल असा विचार ही बंधने घालण्यामागे होता.

सॉल्ट २ हा टप्पा म्हणजे प्रे. कार्टर आणि सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षाचे नेते ब्रेझ्नेव्ह ह्यांनी व्हिएन्ना येथे गेल्या महिन्यात सह्या करून ज्याच्यावर शिक्कामोर्तब केला तो करार. ह्या करारात दोन तरतुदी आहेत. प्रत्येक पक्षाकडे दीर्घ पल्ल्याची किती बाँबवाहू विमाने आणि कोणकोणत्या प्रकारची किती क्षेपणास्त्रे असावीत, ह्यावर मर्यादा घालण्यात आली आहे. १९८१ पर्यंत ही संख्या २४०० असेल. त्यानंतर ती २२५० राहील. दुसरी गोष्ट अशी, की ह्या शस्त्रास्त्रांवर आणखी मर्यादा घालण्याच्या उद्देशाने 'सॉल्ट' बोलणी पुढे चालू ठेवून तिसरा टप्पा – सॉल्ट ३ – गाठण्याचा प्रयत्न करण्याचे उभय पक्षांनी मान्य केले आहे.

पण सॉल्ट २ ने जे साधलेले नाही तेही ध्यानात घेणे आवश्यक आहे. उभयपक्षांकडे किती अणुबाँब असावेत ह्यावर मर्यादा घालण्यात आलेली नाही. उलट हजारो नवीन अणुगोलांचे (वॉरहेड्स) उत्पादन करून त्यांची शस्त्रागारात भरती करणे चालू राहील. मर्यादा क्षेपणास्त्रांवर आणि बाँबवाहू विमानांवर आहे, ह्या वाहनांच्या साहाय्याने वाहून न्यायच्या अणुगोलांवर नाही. करारातील तरतुदींप्रमाणे अमेरिकेला अणुगोलांची संख्या ९,२०० पासून १७,००० पर्यंत वाढविता येईल. रशिया आपला साठा ४,५०० पासून ९,५०० पर्यंत, कदाचित् १८,००० पर्यंत वाढवील अशी अपेक्षा आहे.

तसेच नवीन प्रकारच्या अस्त्रांचा विकास करण्यावरही बंदी घालण्यात आलेली नाही. प्रत्येक पक्षाला एक नवीन प्रकारचे क्षेपणास्त्र बनविता येईल आणि आहेत त्या क्षेपणास्त्रांत सुधारणा करता येईल. तसेच बाह्य अवकाशातून ज्यांचा मारा करता येईल अशा अण्वेतर शस्त्रांविषयीचे संशोधन करायलाही दोन्ही पक्षांना मुभा आहे.

तेव्हा सॉल्ट २ हा कोणत्याही अर्थाने निःशस्त्रीकरणाचा करार नाही. फक्त आज जी शस्त्रस्पर्धा चालू आहे तिला काही मर्यादा घालणारा तो करार आहे. कराराच्या बाजूने जे युक्तिवाद करण्यात आले आहेत ते थोडक्यात असे मांडता येतील : पहिली गोष्ट– आण्विक शस्त्रास्त्रांवर कोणतीच मर्यादा नसण्यापेक्षा काही निश्चित मर्यादा असणे बरे. ह्याचा एक फायदा असा होतो, की प्रतिपक्षाचे जास्तीत जास्त सामर्थ्य किती असेल ह्याचा अंदाज निश्चितपणे बांधता येत असल्यामुळे युद्धाची योजना करण्याला साहाय्य होते. दुसरी गोष्ट– सोव्हिएट रशियाशी स्थिर पायावर संबंध जोडण्याला आणि वातावरणातील ताण कमी करायला अशा कराराची मदत होते. तिसरी गोष्ट– तिसऱ्या टप्प्यासाठी बोलणी सुरू रहातील अशी हमी ह्या करारात असल्यामुळे सॉल्ट ३ गाठून खऱ्या निःशस्त्रीकरणाची सुरुवात करता येईल, ही शक्यता ह्या करारामुळे खुली रहाते.

कराराला जो विरोध करण्यात येत आहे तो दोन परस्परविरुद्ध दिशांकडून होत आहे. ज्यांना निःशस्त्रीकरणाच्या दिशेने खंबीर पावले टाकणे आवश्यक आहे असे वाटते, त्यांना ह्या करारात निःशस्त्रीकरणासाठी काहीही करण्यात आलेले नाही हा त्याचा मोठाच दोष वाटतो. उलट त्यांची भीती अशी आहे, की ह्या कराराचा उलट परिणाम होईल. अणुशस्त्रे वाढविण्याची जी मुभा त्याने दिली आहे तिच्यामुळे आणि त्यातील पळवाटांमुळे अणुशस्त्रे वाढविण्याच्या प्रवृत्तीला उत्तेजन मिळेल आणि नवी शस्त्रस्पर्धा सुरू होईल. ह्याच्या उलट, सॉल्ट-२ ला कित्येकांनी केलेला विरोध हा ह्या करारामुळे अणुशस्त्रांच्या बाबतीत अमेरिका रशियापेक्षा दुबळी होईल, ह्या भीतीवर आधारलेला आहे. त्यांचा अंदाज असा आहे, की अणुयुद्ध झाले तर आपल्या नागरिकांचे परिणामकारक रीतीने संरक्षण करण्याची तजवीज रशियाने अगोदरच केलेली आहे. ह्यामुळे अणुयुद्ध सुरू करणे रशियाच्या दृष्टीने 'व्यवहार्य' ठरले आहे. तसेच रशियाने निर्माण

अनुक्रमणिका

केलेल्या अवजड क्षेपणास्त्रांमुळे ( एस्. एस्. १८ ) अणुयुद्ध जिंकण्याची क्षमता रशियाला प्राप्त झाली आहे. ह्या टीकाकारांचे म्हणणे असे आहे, की येत्या कित्येक वर्षांत रशियाने ही क्षेपणास्त्रे पुरेशा संख्येने योग्य ठिकाणी रचली की अमेरिकेची जमिनीवरची जवळ जवळ सर्व क्षेपणास्त्रे एका आघातात नष्ट करण्याचे सामर्थ्य रशियाला प्राप्त होईल. मग अमेरिकेकडे फक्त पाणबुड्या बोटी आणि बाँबवाहू विमाने उरतील आणि त्यांचाच केवळ वापर करून तिला आण्विक प्रतिहल्ला करता येईल.

ह्या टीकाकारांच्या म्हणण्याप्रमाणे पुढील घटनाक्रम घडून येणे शक्य आहे. समजा काही पेचप्रसंग घडला आहे आणि परिस्थिती आणीबाणीची आहे. मग रशिया एस्. एस्. १८ आणि एस्. एस्. १९ ह्या आपल्या क्षेपणास्त्रांचा पुरेशा प्रमाणावर वापर करून अमेरिकेची जमिनीवरील सर्व क्षेपणास्त्रे नष्ट करील. ह्या हल्ल्यात २ कोटी अमेरिकन्स ठार होतील. आता अमेरिका आपल्या हजारो बाँबवाहू विमानांचा आणि पाणबुड्यांचा वापर करून रशियावर संहारक प्रतिहल्ला करू शकेल. पण अमेरिका प्रतिहल्ला न करता शरणागती पत्करेल.

का ? कारण अमेरिका हा जो प्रतिहल्ला करू शकेल त्याने रशियाची फक्त औद्योगिक केंद्रे व शहरे नष्ट होतील. आणि मग रशिया आपल्या उरलेल्या शस्त्रास्त्रांच्या साहाय्याने जो हल्ला चढवील त्याने सर्व १६ कोटी अमेरिकन्स नष्ट होतील. असा हल्ला ओढवून घेण्यापेक्षा शरणागती पतकरणे योग्य ठरेल असे अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष मानतील. १६ कोटी अमेरिकन्स मेलेले पहाण्यापेक्षा २ कोटी मेलेल्या अमेरिकन्सवर भागविणे बरे. आज रशियाची जी आण्विक क्षमता आहे त्या तोडीची आण्विक क्षमता अमेरिकेकडे नाही ही गोष्ट सर्वजण मान्य करतात.

कराराचे समर्थक हा सारा घटनाक्रम अतिशयोक्तीचा आहे असे मानतात. त्यांचे म्हणणे असे आहे, की रशियाने पहिला हल्ला केल्यानंतर अमेरिका आपल्या उरलेल्या सर्व बळानिशी प्रतिहल्ला करणार नाही अशी हमी रशियाला कधीही मिळू शकणार नाही आणि प्रतिहल्ल्याने रशियाची जी प्रचंड हानी होईल ती रशियन नेते पतकरतील असे मानणे अशक्य आहे.

पण हे सारे तर्कवितर्क आहेत. अणुयुद्ध झाले तर खरोखर काय घडेल, अमेरिकन किंवा रशियन नेते कसे वागतील ह्याचा अंदाज करणे कठीण आहे. एका अर्थाने रशिया पहिला हल्ला करण्याची कितपत शक्यता आहे ह्या प्रश्नाचा सॉल्ट बोलण्याशी फारसा संबंध नाही. कारण पहिल्या हल्ल्याची शक्यता ध्यानी घेऊन जी उपाययोजना करावी लागेल तिला सॉल्ट २ ने मुभा दिली आहे. ही उपाययोजना म्हणजे जमिनीवरील क्षेपणास्त्रांचे संरक्षण अधिक परिणामकारक करणे आणि स्वत: पहिला हल्ला करण्याची क्षमता प्राप्त करून घेण्यासाठी क्षेपणास्त्रे सुधारणे. तसेच नागरी संरक्षण अधिक परिणामकारक करण्यासाठी जे काही करणे आवश्यक असेल ते करण्याची मोकळीक सॉल्ट २ ने ठेवली आहे.

दुसरा प्रश्न उपस्थित होतो तो असा की रशिया ह्या करारातील तरतुदींचे पालन करील ह्याची शाश्वती काय ? पण कराराच्या समर्थकांचे म्हणणे असे आहे की रशिया शस्त्रास्त्रांच्या क्षेत्रात जे कांही करीत असेल त्याचा पत्ता उपग्रह आणि इलेक्ट्रॉनिक साधने यांच्या सहाय्याने लावता येईल. पण ह्या प्रश्नाचाही सॉल्ट २ कराराशी साक्षात संबंध नाही. कारण शत्रूशी करार होवो किंवा न होवो, शत्रू काय करीत आहे ह्याची बातमी सतत काढीत असणे आवश्यक असते.

थोडक्यात असे म्हणता येईल की सॉल्ट २ करारामुळे अमेरिकेची किंवा रशियाची परिस्थिती आज आहे त्याहून अधिक वाईट होणार नाही. झाला तर ह्या करारामुळे उभयतांचा व जगाचा फायदाच होईल. कारण आज उपलब्ध असलेली संहारक शस्त्रे पुरेशी आहेत ह्या म्हणण्याला दोन्ही पक्षांनी हा करार करून सुप्त मान्यता दिली आहे. शस्त्रास्त्रवाढीच्या अमर्याद स्पर्धेला तिच्यामुळे आळा बसला आहे. आज जी आण्विक शस्त्रे अस्तित्वात आहेत ती कमी करण्याचा किंवा समूळ नष्ट करण्याचा मार्ग ह्या करारामुळे मोकळा झालेला नाही. पण सॉल्ट ३ ह्या टप्प्यावरच्या करारामुळे हे साध्य गाठणेही शक्य आहे अशी आशा तरी निर्माण झाली आहे, ही गोष्टही कमी नव्हे.

अनुक्रमणिका

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

## मराठी

| | | |
|---|---|---|
| (१) | वैदिक संस्कृतीचा विकास : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ....... | ३०.०० |
| (२) | अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) : ............... ब्र. स्वामी केवलानंदसरस्वती ............... | ७५.०० |
| (३) | इतिहासाचे तत्त्वज्ञान : प्रा. सदाशिव आठवले .............. | १०.०० |
| (४) | क्रोचेचे सौंदर्यशास्त्र : एक भाष्य : डॉ. रा. भा. पाटणकर ...... | १०.०० |
| (५) | पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास : ........ डॉ. सुमंत मुरंजन ........ | ८.०० |
| (६) | गीता-प्रवेश : डॉ. गो. वि. देवस्थळी ................ | ५.०० |
| (७) | लोकशाहीचे धोके : पन्नालाल सुराणा ................ | ४.०० |
| (८) | भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श : सौं. कमल पाध्ये ............ | ४.०० |
| (९) | हिंदी साहित्यविचार : प्रा. प्यारेलाल गोहेल ............ | ३.०० |
| (१०) | महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना : .......... चा. अ. दाभोलकर .......... | २.०० |
| (११) | श्री. यशवंतराव चव्हाण – अभिनंदनग्रंथ .................. | २०.०० |
| (१२) | संशोधन साधना : डॉ. वसंत स. जोशी ................ | १२.०० |
| (१३) | ज्ञानदेव चिंतन (संपादित) : डॉ. वसंत स. जोशी .......... | २०.०० |
| (१४) | आनंदाचा डोह : प्रा. रा. ग. जाधव ................ | ८.०० |
| (१५) | भावार्थ रामायण (श्री एकनाथ महाराज कृत) बालकांड : .... | १२.०० |
| (१६) | तरंगयामिक व पुंजयामिक : मा. ग. टोळे ................ | ५.०० |
| (१७) | आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास .......... | २०.०० |
| (१८) | वागीश्वरी : डॉ. गो. के. भट ................ | १०.०० |

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई (जि. सातारा)

**ग्रंथ विक्रेत्यांना २० टक्के कमिशन.**

हे मासिक पां. गो. आपटे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.








